# सर्वज्ञ श्री चक्रधर

प्रा. पुरुषोत्तम नागपुरे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# निवेदन

महाराष्ट्राच्या जडणघडणीत ज्या महनीय व्यक्तींचा मोलाचा वाटा आहे अशा व्यक्तींपैकी श्री चक्रधर स्वामी एक होत.

कोणत्याही व्यक्तीच्या कार्याचं मोल जाणून घ्यायचं असेल तर ज्या काळात ती व्यक्ती जन्माला आली तो काळ, ती परिस्थिती व त्याकाळात परिस्थितीत त्या व्यक्तीनं केलेले कार्य लक्षात घ्यावयास हवं. श्री चक्रधर स्वामींच्या जिवितकार्याचं महत्व जाणून या ग्रंथाचे लेखक श्री. पुरूषोत्तम नागपुरे यांनी त्यांना महाराष्ट्र संस्कृतीचे पहिले ज्ञात शिल्पकार, असे म्हटलेले आहे.

मराठीतल्या सर्वसामान्य वाचकांना श्री चक्रधर स्वामी यांच्या जीवन कार्याचा अगदी थोडक्यात परिचय व्हावा, या जाणिवेतून अशा प्रकारचा ग्रंथ लिहिण्याची आम्ही श्री. पुरूषोत्तम नागपुरे यांना विनंती केली. आमच्या या विनंतीला मान देऊन त्यांनी श्री चक्रधर स्वामी यांच्या जीवन-कार्याची आटोपशीर व नेटक्या स्वरूपात हा ग्रंथ लिहून ओळख करून दिली व हा ग्रंथ प्रसिद्धीसाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला उपलब्ध करून दिला, त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

मराठी वाचकांना हा ग्रंथ आवडेल व श्री चक्रधर स्वामींच्या लोकोत्तर कार्याची पुरेशी ओळख होईल असा आम्हाला विश्वास वाटतो.

**रा. रं. बोराडे**
**अध्यक्ष**
*महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ*

**मुंबई,**
दिनांक : **९ जुलै, २००२**

# सर्वज्ञ श्रीचक्रधर

## श्रीचक्रधरस्वामींचे महाराष्ट्र-प्रेम

"महाराष्ट्री असावे : महाराष्ट्र म्हणजे महंतराष्ट्र : महंत म्हणजे थोर :" अशी महाराष्ट्रास अप्रतिम प्रशस्ती देणारे श्रीचक्रधरस्वामी मुळचे गुजरातचे होते. स्वामींच्या विचारांचे भाष्यकार 'आचारस्थळ' नावाच्या ग्रंथात लिहितात, "महाराष्ट्र सात्विकः तेथचे जड पदार्थ तेही सात्विक : तेथ असता शारीर मानसिक उपद्रव नुपजतीः आणिक देशी शारीर मानसिक उपद्रव उपजला असे तो महाराष्ट्री शमे : तेथचा वारा : झाडे : पाऊस तोही सात्विक : तेणे सकळही उपद्रव समेती : आपण अनाचार न करी : आणिकाशी करू नेदी ते महाराष्ट्र : धर्म सिद्धी जाय ते महाराष्ट्रः" हा उतारा वाचून महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार म्हणतात की, "हे महाराष्ट्राचे महिम्न स्तोत्र आहे" हे स्तोत्र गाण्याची प्रेरणा देणारे श्रीचक्रधरस्वामी म्हणूनच या महाराष्ट्र संस्कृतीचे पहिले ज्ञात शिल्पकार आहेत असे म्हणावे लागते.

## मराठी भाषेला देववाणीचा सन्मान

श्रीचक्रधरस्वामींनी महाराष्ट्राची व्याप्ती गोंदिया ते गोवा एवढी मानलेली होती. जेथे जेथे मराठी बोलली जाते तो सर्व महाराष्ट्र प्रदेश अशी त्यांची महाराष्ट्राची सोपी व्याख्या होती. महाराष्ट्राची महती सांगूनच स्वामी थांबले नाहीत तर मराठी भाषेलाही त्यांनी देववाणीचा सन्मान बहाल केला. आपली धर्मतत्त्वे त्यांनी मराठीतूनच सांगितली होती. त्यांच्या शिष्यांनीही धर्माच्या तत्त्वांची चर्चा मराठीतूनच करावी असा त्यांचा दंडक होता. सर्व सामान्य जनांना गीतेतील ब्रह्मविद्या सांगून त्यांनी मराठी भाषेला धर्मसिंहासनी विराजित केले. त्यामुळेच उत्तरकाळात पं. केसीराजासारख्या संस्कृत तज्ज्ञास स्वामींचा सूत्रपाठ संस्कृतातून तयार करण्यास

प्रथम आचार्य श्रीनागदेव यांनी मनाई केली होती. नागदेवाचार्य म्हणाले होते, "ना. गा. केशवदेया! एणे माझीया स्वामींचा सामान्य परिवारू नागवेल कीं गाः" याचा अर्थ स्वामींचा सामान्य परिवार हा संस्कृत न जाणणारा होता. त्यासाठीच सामान्य जनांच्या बोलभाषेतूनच तत्त्वज्ञान सांगावे असा कटाक्ष पाळणारा एक धर्मपंथ श्रीचक्रधरांनी महाराष्ट्रात स्थापन केला होता. हे त्यांचे महाराष्ट्र आणि मराठी भाषेवरचे प्रेम अप्रतिम आहे. यातूनच गेल्या सातशे वर्षात मराठी भाषेत, विविधांगी साहित्यनिर्मिती होऊ शकली. या साहित्यात विपुल काव्य प्रकार आहेत. तसेच नानाविध गद्य वाङ्मयाचे नमुने आहेत. व्याकरण आणि छंदशास्त्रावरचे ग्रंथ आहेत. तसेच असंख्य शब्दकोशही आहेत. तत्त्वज्ञानाला आवश्यक अशी पारिभाषिक शब्दावली मराठीत निर्माण करण्याचे श्रेयही महानुभावीय साहित्यिकांना द्यावे लागते. वाक्य-मीमांसा मराठीत निर्माण करण्याचे अजोड कर्तृत्वही महानुभावांकडेच जाते. अशी बरीचशी नवी आणि विपुल साहित्यसंस्कृती निर्माण करणाऱ्या महानुभाव साहित्यिकांचे प्रेरणास्थान श्रीचक्रधरस्वामी होते. त्यामुळे ते महाराष्ट्राच्या साहित्य संस्कृतीचे जनक होते, हे निर्विवादपणे मान्य करावे लागते.

## सुधारक विचारांचा प्रसार

श्रीचक्रधरस्वामींचा काळ हा १२ व्या शतकाचा होता. सिंघनदेव यादव, कन्हरदेव यादव, महादेवराव यादव, आमणदेव यादव आणि रामदेव यादव एवढ्या शासकांचा तो काळ होता. या काळात श्रीचक्रधरांनी आपली परिवर्तनवादी धर्ममते महाराष्ट्रातील सामान्य जनांना सांगितली व त्यांचा प्रसार केला. त्याकाळी समाजव्यवस्था ही धर्माने शिकविलेल्या नीतितत्त्वांनी चालत असे. धर्ममते हेच त्यावेळचे कायदे होते. विशेषतः मनुस्मृती हीच त्याकाळची सामाजिक व्यवस्थेची आचारसंहिता होती. त्यामुळे चातुर्वर्ण्य-व्यवस्था ही समाजाने कटाक्षाने जपलेली समाजव्यवस्था होती.

उच्चवर्णियांनी राज्य करावे. ब्राह्मण वर्गाने लोकांना नीतितत्त्वे शिकवावीत. त्या नीतितत्त्वांचे समाजाने पालन करावे म्हणून राज्ययंत्रणेने शासन करावे. समाजाचे पोषण करण्यासाठी वैश्यांनी सतत राबावे आणि जीवनावश्यक वस्तूंचे उत्पादन आणि वितरण करावे, हा वैश्यांचा समाजधर्म होता. स्वधर्म होता. स्वधर्म पालन न करणाराला दंडित करण्याचा अधिकार राजे म्हणविणाऱ्या क्षत्रियांना होता.

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या त्रैवर्णिकांची सेवाचाकरी करणारा अजून एक वर्ग होता. त्याला शूद्र असे म्हणत असत. ही चातुर्वर्ण्यव्यवस्था भारतभर सुस्थिर झालेली होती. तशीच ती महाराष्ट्रातही होती.

वैश्य आणि शूद्रांनी समाजाचे पोषण करावे इथपर्यंत ठीक होते. परंतु पुढे पुढे द्विजांनी आपल्या अधिकारांचा दुरूपयोग करून वैश्य-शूद्रांचे शोषण सुरू केले. त्यामुळे पुढे अन्न पिकविणारा शेतकरी उपाशी राहून द्विजांचे पोषण करू लागला. वस्त्र विणणारा नागवा राहू लागला. जोडे शिवणारा अनवाणी फिरू लागला. राजे आणि पुरोहित मात्र या वैश्य-शूद्रांच्या कष्टार्जित वस्तूंचा मुक्तपणे उपभोग घेऊ लागले, आणि या उत्पादक व्यावसायिकांना हीन समजून वागवू लागले. ही विकृती शिगेस पोचली होती. स्वामींच्या काळात या विकृतीचा कळसच झाला होता.

वैश्य आणि शूद्रांना द्विजांच्या धर्माचा आचार करण्याचाही हक्क नाकारण्यात येऊ लागला होता. धर्माचे कर्मकांड हे केवळ द्विजांसाठी राखीव होते. सर्व जगाचा निर्माता आणि नियंता असा परमेश्वर वैश्य-शूद्रांना त्यांचे भजन पूजन करण्याचे स्वातंत्र्य नाकारण्यात येऊ लागले होते. भगवंताच्या मूर्ती ज्या मंदिरात असायच्या, त्या मंदिराच्या आत पाय ठेवण्याचीही शूद्रांना बंदी होती. सर्व प्रकारची सुखप्राप्ती व्हावी म्हणून देवी-देवतांचे पूजन करावे, त्यांना नैवेद्य दाखवावा, त्यांची भक्ती करावी, यज्ञविधी करावेत, असे सांगणारे पुरोहित शूद्र समजल्या जाणाऱ्या बहुजनांना हे सर्व धर्मकर्म करण्यास मनाई करू लागले होते. हा द्विजांसाठी राखीव धर्म बहुजनांना नाकारण्यात येऊ लागला होता. त्यामुळे समाजातला खूप मोठा वर्ग धर्मापासून वंचित ठेवण्याचा अधर्म पुरोहितांनी बिनदिक्कतपणे चालविलेला होता. बहुजनांवर होणारा अन्याय दूर करण्याची गरज होती. धर्ममंदिराची दारे बहुजनांना खुली करण्याची तातडीची आवश्यकता होती. ते कार्य श्रीचक्रधरांनी सुरू केले होते. आपण सर्व अच्युतगोत्रीय आहोत. सर्वांना धर्माची दारं उघडी आहेत. देवाच्या दारात कुणी श्रेष्ठ नाही आणि कुणी कनिष्ठ नाही, असे स्वामी श्रीचक्रधर सांगू लागले होते.

### जातिप्रथेचे निर्मूलन

देशभर जातिजातींच्या उतरंडी रचल्या गेल्या होत्या. वरच्या जातीचा माणूस खालच्या जातीच्या लोकांना शूद्र मानीत असे. त्यामुळे काही वरच्यांचे कनिष्ठत्व

मान्य केले तरी अनेक खालच्या जातींचे वरिष्ठत्व मिळाल्याचा खोटा आनंद मानण्यात सर्वच जाती समाधानात असायच्या.

या जातीच्या उतरंडीमुळे जातिजातीत दुरावे निर्माण झाले होते. खालच्या जाती वरच्यांना अस्पृश्य वाटत असत. त्यामुळे भारतीय समाज एकसंघ राहिला नव्हता. आपल्या जातीपुरता वेगळा समाज मानणारांचा हा देश एकात्म राहिला नव्हता. त्याची अनेक शकले झालेली होती.

**परिवर्तनाची हाक**

अशा जातिपातीच्या उच्चकनिष्ठत्वाच्या भिंती बांधून जगणाऱ्या समाजाला जातिनिर्मित उच्च-कनिष्ठत्वाचा विचार सोडा असे श्रीचक्रधर सांगत होते. ते म्हणायचे, "उत्तम भणिजे ब्राह्मण : आन आधम भणिजे मातंग : ऐसे म्हणे : परी तोही मनुष्य देहची : परिवृथा कल्पना करी :" त्यांचे हे परिवर्तनवादी विचार आपल्या शिष्यांनी कृतीत उतरवावे म्हणून ते म्हणायचे, "महारवाड्याहोनि धर्म काढावा!" "घर न निवडीता भिक्षा कीजे :" स्वामींची ही वैचारिक भूमिका त्यांच्या आचारांच्या आज्ञांमुळे तर अधिकच प्रभावी ठरली होती. वागण्यात आणि बोलण्यात संगती असणारा हा थोर परिवर्तनवादी महापुरुष म्हणूनच महाराष्ट्रातील युगंधर मानावा लागतो. त्यांनी दिलेली परिवर्तनाची हाक महाराष्ट्रात अपूर्व होती, नव्हे त्या काळापर्यंत संपूर्ण भारतात अशी सामाजिक, धार्मिक, परिवर्तनाची हाक कुणी दिलेली आढळून येत नाही.

या महान परिवर्तनवादी धैर्यधराचे महाराष्ट्रात अवतरण झाले तो काळ १२ व्या शतकाचा होता. त्यांचा जन्म मात्र गुजराथेत झाला होता. त्यांनी आपला देश, आपले स्वजन, स्वसंबंध आणि स्वसंबंधीयांचे संबंध त्याज्य केले होते. ते म्हणायचे, "संबंध त्याज्य : स्वसंबधीयांचा संबंध तो विशेषतः त्याज्य :" हा त्यांचा उपदेश त्यांनी आपले आचरणात उतरविलेला होता. आपले पूर्वाश्रमीचे नाव, गाव, जात, कुळ, गोत्र विसरूनच ते येथे आले होते. त्यांना कुणीतरी विचारले होते, "गोसावीयाते कोण्ही असे?" त्यावर स्वामी म्हणाले होते, "याते कोण्ही नसे :काई हे ब्राह्मण : की क्षेत्रीय : की वैश्य की शूद्र : हे नेणीजे की बाई :" आम्ही आता संन्यस्त गोसावी झालेलो आहोत. आम्हांस आता जुन्या नावाची, गावाची, गोत्राची आठवण विसरले पाहिजे अशी त्यांची भूमिका होती. असे असले तरी त्यांनी प्रसंगोपात्त आपले पूर्ववृत्त सांगितलेले दिसते. त्यावरून त्यांच्या

जीवनपटाचा स्थूल आलेख नोंदविणे शक्य होऊ शकते. तसे त्यांनी आपले नावसुध्दा कधी सांगितले नाही. त्यांना बोणेबाई नावाच्या मेहकरच्या बाईने विचारले होते.

''बाबा! आपुले नांव काई?''

त्यावर स्वामी मौन राहिले होते. दोन तीनदा विचारूनही स्वामींनी मौन सोडले नाही तेव्हा बोणेबाई म्हणाली,

''मग आपण काय मौन्यदेव आहांत?''

यावर होकारार्थी मान हलवून स्वामींनी आपली या नावाला सहमती दर्शविली होती. पूर्वीचे नाव मात्र त्यांनी उच्चारते नव्हते. असा हा अनाम, अनिकेत धर्मात्मा गुजराथेतून महाराष्ट्रात आला आणि अनेक परिवर्तनवादी विचारांची बीजे पेरून गेला. ते त्यांचे नवे विचार क्रांतिकारी होते.

असा हा महापुरुष कोण होता? कोठला होता? हे प्रश्न अनेकांच्या मनात उठले होते. त्यांचे पूर्ववृत्त जाणून घेण्यासाठी त्यांच्या संपर्कात आलेल्या शिष्यांनी त्यांना वारंवार प्रश्न विचारले होते. त्या प्रश्नांची उत्तरे काहीवेळा त्यांनी दिलेली होती. त्या उत्तरांचे धागे जुळवून त्यांचे एक जीवनचित्र स्पष्ट होत गेले. त्यावरून त्यांच्या जीवनचरित्राचा वेध घेता येतो.

**जन्मस्थान भडोच : गुर्जर देशाची प्राचीन राजधानी**

श्रीचक्रधरांचे जन्मस्थान भडोच गुजराथच्या राजधानीचे नगर होते. यालाच भृगुकच्छ म्हणत असत. गुजराथला ४ लाट देश या नावाने संबोधीत असत. भडोच हे पश्चिम समुद्रावरील एक चांगले बंदर होते. परदेशातून येणारा माल येथेच उतरविण्यात येत असे. त्यामुळे पश्चिम भारताची ही उत्तम बाजारपेठ होती.

या लाटदेशाचा राजा 'सोळंकी वंशातील' भोला भीमदेव हा होता. तो स्वभावाने अत्यंत भोळा असल्यामुळे त्याला 'भोला' ही उपाधी मिळाली होती. त्याच्या भोळेपणामुळे तो राज्यकारभार सांभाळण्यास असमर्थ होता. त्यामुळे त्यांनी आपला प्रधान लवणप्रसाद यांच्याकडे राज्याची सर्व सूत्रे सोपविली होती. लवणप्रसादाचा कर्तृत्ववान पुत्र वीरधवल हा होता. लवणप्रसाद आणि वीरधवल या दोन्ही पिता-पुत्रांना लोक प्रधान मानीत असत. परंतु ते पुण्याच्या पेशव्यासारखे पूर्णपणे स्वायत्त राहून राज्यकारभार पाहत असत.

भोला भीमदेवाच्या स्वाभाविक मृत्यूनंतर त्यांचा मुलगा गादीवर आला.

परंतु तोसुद्धा भीमदेवासारखा भोळा असल्यामुळे त्याला लवकरच पदच्युत करून वीरधवलाने लाट देशाची सत्ता पूर्णपणे आपलेकडे घेतली. या औपचारिक राज्यांतरानंतर लवणप्रसाद आणि वीरधवल यांनी आपले पदरी वस्तुपाल आणि तेजपाल या नावाच्या दोन बुद्धिमान आणि मुत्सद्दी जैन प्रधानांची नियुक्ती केली. या दोन जैन प्रधानांनी अबु येथे अत्यंत भव्य तितकेच दिव्य संगमरवरी मंदिर बांधले. त्यावर आजही लावण्यात आलेल्या लेखात स्पष्टपणे उल्लेख आहे की, "गुजराथचा सोळंकी राजा वीरधवल याचे प्रधान वस्तुपाल आणि तेजपाल या जैनांनी हे भव्य मंदिर बांधलेले आहे." या उल्लेखावरून स्पष्टपणे असे लक्षात येते की, ज्यांनी हे भव्य आणि सुंदर जैन मंदिर बांधले ते वस्तुपाल आणि तेजपाल हे दोन सोळंकी कुळातील वीरधवलाचे प्रधान होते. वीरधवलाचे वडील श्री लवणप्रसाद हे स्वतःला राजा भीमदेवाचे प्रधान मानीत असत. परंतु वीरधवल मात्र स्वतःला राजा मानू लागला होता. तो क्षत्रिय राजपूत सोळंकी कुळातील राजा होता.

याला एक शूर पुत्र होता. त्याचे नाव विशालदेव होते. हा पुढे गुजराथ आणि राजस्थानात सम्राट विशालदेव या नावाने प्रसिद्धीस आला. याच्या पराक्रमाच्या गौरवगाथा शतकानुशतके उत्तर भारतात गायिल्या जात आहेत. हिन्दी मधील पहिले ज्ञात काव्य 'बिसलदेव रासो' याच्याच पराक्रमाची कहाणी सांगणारे आहे.

या विशालदेवाचा विवाह चव्हाण राजकुलातील माल्हनदेवीशी झाला होता, असे कै. महंत मुकुंदराज आराध्य महानुभाव यांनी सखोल संशोधन करून 'श्रीचक्रधर लीला चरित्र' नावाच्या बृहद्ग्रंथात स्पष्टपणे नोंदविले आहे. सोळंकी कुळातील विशालदेव आणि चव्हाणकुलोत्पन्न माल्हनदेवी यांचे उदरी एक तेजस्वी पुत्ररत्न जन्मास आले होते. त्याचे नाव हरिपालदेव असे होते. पुढे हेच हरपाळदेव आपले चरित्रनायक 'श्रीचक्रधर' या प्रासादिक नावाने प्रसिद्धीस आलेले होते. ते सोळंकी (वाघेला शाखीय) राजपूत राजकुळातील सामवेदी लाड होते. असेही कै. महंत मुकुंदराज आराध्य यांनी अभ्यासान्ती सिद्ध केलेले आहे.

परंतु श्रीचक्रधर चरित्राचे लेखन करणाऱ्या अनेक लेखकांनी मात्र ते 'सामवेदी लाड ब्राह्मण' असल्याची नोंद केलेली दिसून येते. ही नोंद श्रीचक्रधर स्वामींच्या आत्मकथनपर एका वाक्याचे अनुषंगाने करण्यात आलेली आढळते.

श्रीचक्रधर स्वामींना एकदा त्यांची शिष्या महदाईसा हिने विचारले होते की आपले पूर्वीचे कुळ गोत्र काय? माता पिता कोण होते? त्यावर श्रीचक्रधर स्वामींनी सांगितले होते कीं 'आम्ही सामवेदी लाड' आहोत, आणि आमच्या पित्याचे नाव विशालदेव असून मातेचे नाव 'माल्हनदेवी' आहे. या स्वामींचे आत्मकथनावरून स्वाभाविकच अनेक लेखकांचा गैरसमज असा झाला की ज्या अर्थी ते 'सामवेदी' म्हणवितात त्याअर्थी ते 'ब्राह्मण' असलेच पाहिजेत. कारण वैदिक शाखा या केवळ ब्राह्मणातच असतात, अशी प्रचलित समजूत आहे. परंतु क्षत्रिय हे द्विज असल्यामुळे त्यांच्याही कुळात वैदिक शाखा होत्या. हे वास्तव अनेक चरित्र लेखकांनी दुर्लक्षित केले. त्यासाठी भडोचच्या सोळंकी राजवंशाचे गोत्र विवरण पाहणे आवश्यक आहे. पं. बलदेव प्रसाद मिश्र यांनी 'टॉड राजस्थान' या संशोधनपर ग्रंथात अध्याय ६ पृष्ठ ६० वर सोळंकी कुळाचे खालीलप्रमाणे वर्णन दिलेले आहे.

''माध्यंदिन शाखा, भारद्वाज गोत्र, गढलोहकोट निवास, सरस्वती नदी, सामवेद, कपिलेश्वरदेव, कर्दुमान रिकेश्वर, तिन पुरवार जिनार, किनोज देवी महापालपुत्र.''

या गोत्र विवरणावरून सोळंकी राजे हे माध्यदिन शाखेचे सामवेदी क्षत्रिय राजे होते. ते ब्राह्मण नव्हते असे स्पष्टपणे दिसून य[illegible]. क्षत्रियांच्या गोत्रांच्या नोंदीत त्यांची वैदिक शाखा नोंदविण्याची पद्धती भारतभर मान्यता पावलेली होती. क्षत्रिय हे द्विज असल्यामुळे त्यांच्या वैदिक शाखांची नोंद होत होती. तसा उल्लेख गुजराथ वा लाट देशाच्या सुप्रसिद्ध राजपूत क्षत्रिय सोळकी कुळाच्या इतिहासात आलेला आहे. हे श्री विशालदेव यांचे कुळ गोत्र विवरणात स्पष्टपणे नोंदविलेले आहे. हाच विशालदेव आपल्या अतुल पराक्रमाने गुजराथ (लाट देश) आणि राजस्थानच्या इतिहासात पुढे 'सम्राट विशालदेव' या नावाने प्रसिद्धीस आला होता आणि याच्याच पराक्रमाची गाथा 'बिसलदेव रासो' या पहिल्या हिंदी महाकाव्याचा विषय ठरली होती. हेही ऐतिहासिक स[illegible] आहे.' या ऐतिहासिक नोंदी वरून खालील गोष्टी स्पष्ट होतात.

(१) राजा वीरधवल हा सोळंकी कुळातील [illegible]त्रिय राजा होता. तो आपल्या पित्यासारखा म्हणजे लवणप्रसादासारखा प्रधान राहिलेला न[illegible]हता. गुजराथच्या जनतेने वीरधवलांना प्रधान नव्हे, राजा मानलेले हो[illegible].

(२) वीरधवलाचे पदरी वस्तुपाल आणि तेजपाल हे दोन बुद्धिमान आणि मुत्सद्दी प्रधानमंत्री होते. ते जैन होते. त्यांनी जगप्रसिद्ध अशी अबु येथील जैन मंदिरे बांधलेली होती. ती प्रसिद्ध वास्तुशिल्पे या इतिहासाची साक्ष द्यायला आजही शाबूत आहेत. या दोन प्रधानांचा राजा वीरधवल होता. म्हणून तो किंवा त्यांचे पुत्र भडोचचे प्रधान राहिलेले नव्हते. ते स्वयंघोषित राजे झालेले होते. हे स्पष्ट आहे.

(३) हे राजे क्षत्रिय होते. सामवेद ही त्यांची वैदिक शाखा होती आणि ते लाट देश म्हणजेच गुजराथचे राजे होते. त्यामुळे ते 'सामवेदी लाड' या संज्ञेस पात्र होते.

वरील विवेचनावरून हे स्पष्ट होते की राजा वीरधवल आणि त्याचा पुत्र सम्राट विशालदेव हे गुजराथचे सोळंकी कुळातील राजे म्हणून उदयास आले होते. 'बिसलदेव रासो' या महाकाव्याचा नायक 'सम्राट' या पदवीपर्यंत पोहचलेला महाप्रतापी राजा होता. त्याचा विवाह कै. महंत मुकुंदराज म्हणतात तसा चव्हाण राजकुलातील माल्हनदेवीशी झालेला होता. राजदम्पतीस 'हरिपाळदेव' नावाचे सुंदर पुत्ररत्न प्राप्त झाले होते. तेच हरिपाळ वा हरपाळदेव पुढे श्रीचक्रधर या नावाने महाराष्ट्रात उदयास आले होते. तेच या ग्रंथाचे चरित्रनायक आहेत. हे आता ऐतिहासिक पुराव्याने सिद्ध झालेले आहे.

## सिंघनदेवाचे समकालीन

महाराष्ट्राच्या इतिहासाची साधने सांगतात की राजा सिंघनदेव यादव हा आपल्या पराक्रमाने दक्षिण आणि उत्तरेकडील सीमावर्ती राज्यावर सतत स्वाऱ्या करीत होता. सिंघनाच्या पदरी खोलेश्वर नावाचा शूर सेनापती आणि कुशल प्रधान होता. एकदा या खोलेश्वराचे नेतृत्वाखाली यादव सैन्याने लाट देश अर्थात गुजराथवर आक्रमण केले होते. या स्वारीचा उल्लेख गुजराथच्या इतिहासात येतो. त्यावेळी भोला भीमदेवाचा प्रधान लवणप्रसाद होता. त्याने यादव सेनेशी लढाई केली होती. या लढाईत गुजराथची बरीच हानी झालेली होती. त्यावेळी लवणप्रसादाचा शुर पुत्र वीरधवल हा या लढाईत सहभागी झालेला होता. त्याचा पुत्र जो पुढे राजा म्हणवून घेऊ लागला तो विशालदेवही या लढाईत प्रत्यक्ष भाग घेत होता. त्याचवेळी विशालदेवाचा पुत्र 'हरिपाळदेव' हा २३-२४ वर्षाचा तरुण होता.

या लढाईत लाट देशातील सैन्य मागे रेटल्या गेले होते. इ. स. १२१० मध्ये

ही स्वारी झालेली होती. तेव्हा लवणप्रसाद जिवंत असला तरी तो म्हातारा होता. वीरधवल आणि विशालदेव लढाईचे सूत्रसंचालन करीत होते. परंतु यादव सेनेसमोर गुर्जर सेना टिकेल असे वाटत नव्हते. घनघोर युद्ध सुरू होते. भडोचच्या वेशीवरच युद्ध येऊन पोहचले होते. गुजराथी सेना परास्त होण्याची चिन्हे दिसत होती. अशा प्रसंगी म्हाताऱ्या लवणप्रसादाने पुत्र वीरधवल आणि पौत्र विशालदेवांना बोलावून तहाची बोलणी सुरू करण्यासाठी दूत पाठविण्याचा सल्ला दिला.

अशावेळी २३-२४ वर्षांचा तरुण हरपाळदेव या राजकुमाराने आपल्या तारुण्यसुलभ उत्साहाने म्हटले, ''आपण तह करण्याऐवजी लढावे हेच आपले कर्तव्य आहे. आपण आपल्या शर्तीवर सन्मान्य तह करण्याचे स्थितीत येईपर्यंत लढलेच पाहिजे. त्यावर मुत्सद्दी आणि अनुभवी लवणप्रसाद, वीरधवल आणि विशालदेवांनी परिस्थिती समजावून दिली. परंतु युद्धोत्सुक हरपाळदेवांनी स्वतःकडे लढाईचे नेतृत्व घेतले आणि लढाईत आपल्या तरुण सेनेसह ते उतरले.

**घनघोर युद्धात हरपाळदेवाची सरशी**

हरपाळदेवाची तरुण सेना आपल्या भूमीच्या रक्षणासाठी लढायला उतरली होती. हरपाळदेवाचे प्रेरणादायी नेतृत्व लाभलेली ही सेना नव्या दमाने लढायला उतरल्यामुळे तिच्यात जोश होता. सळसळत्या रक्ताचे हे गुर्जर तरुण मराठा सैन्यावर तुटून पडले. घनघोर युद्ध सुरू झाले होते.

सिंघनाचे सैनिक लांबवरून आलेले होते. लढून लढून थकलेले होते. त्यांच्या कमजोर स्थानांवर हरपाळदेवाच्या सैन्याने निकराचे हल्ले चढविले. दोन दिवसाच्या तुंबळ युद्धानंतर हरपाळदेवांनी सिंघन यादवांच्या सेनेची अभेद्य फळी तोडण्यात यश मिळविले. एकदा फळी तुटल्यावर गुर्जर सेना नव्या दमाने तुटून पडली. यादव सेना मागे सरकली होती. तिला मागे रेटत रेटत नेताना शत्रु सैन्यात घबराट निर्माण करण्यात हरपाळदेवांना यश आले आणि शेवटी यादव सेना मागे पळू लागली. मिळेल त्या वाटेने माघारी पळणारे सैन्य पुन्हा एकत्र करून लढाईस सज्ज करणे विंझदेव-जगळदेव नावाच्या मराठी सेनापतींना शक्य झाले नाही व मराठी सेना पळू लागली.

**हरपाळदेवानी पाठलाग सुरू केला**

हरपाळदेवानी या पळत्या सेनेला आपल्या मार्गाने सुखासुखी पळू दिले नाही. त्यांचा पाठलाग करून वेगवेगळ्या दिशांनी पळणाऱ्या सेनेला त्यांनी पळता

भुई थोडी करून सोडली. गुर्जर वीर आपला पाठलाग करीत आहेत या भीतीने मिळेल त्या वाटेने मराठी सेना पळत होती. तिचा हरपाळदेवांनी पाठलाग सुरूच ठेवला होता. तो थेट वेरूळच्या लेण्यापर्यंत सुरूच ठेवला. देवगिरीच्या किल्ल्यात वार्ता पोहचली. आणि राजा सिंघनाने तहाचा निरोप पाठविला.

या तहाचा एक मसुदा उपलब्ध झालेला आहे. तो येथे देणे उद्‌बोधक होईल. हा तह राजा सिंघनदेव आणि पितामह लवणप्रसाद यांचे नावे करण्यात आला होता. तो असा -

''श्रीमद्विजय कटके महाराजाधिराज श्री सिंघणदेवस्य महामडलेश्वर राणक श्री लवणप्रसादस्यच संराज कुत श्री. सिंघनदेवेन महामंडलेश्वर राणक श्री लवणप्रसादेन पूर्व रुढ्यात्मीय २ देशुषु रहणीय। केन्यादपि कस्यापि भूमिर्न आक्रमणीय।। इत्यादी।।''

या तहनाम्यावरून असे स्पष्टपणे म्हणता येते की महामंडलेश्वर लवणप्रसाद यांना 'राणक' अशी उपाधी लावल्यामुळे ते आता प्रधान राहिलेले नव्हते. तर ते राणक म्हणजे राजे होते. या तहनाम्यानंतर विजयी गुर्जर सेनेसह राजकुमार हरपाळदेव आपल्या देशात परतले. रस्त्यात त्यांनी या युद्धामुळे बेचिराख झालेली गावं पाहिली होती. उद्‌ध्वस्त झालेले अनेक संसार पाहिले होते. गावागावात सांडलेले रक्त अजून सुकले नव्हते. रणभूमीवर जखमी सैनिक पडलेले होते. त्यांचे विव्हळणे सुरूच होते. आणि मृत झालेल्या सैनिकांची प्रेते अजूनही उचलण्यात आलेली नव्हती. कोल्ह्याकुत्र्यांची गर्दी जमलेल्या रणभूमीचे विदारक दृश्य पाहून हरपाळदेवांचे संवेदनशील मन उदास झाले होते. दुःखी झाले होते. त्यांनी स्वपराक्रमाने मिळविलेल्या विजयाचा आनंद त्यांना विषमय वाटू लागला होता. अनेक तरुण सैनिक धारातीर्थी पडले होते, त्याची बायकामुले पोरकी झालेली होती. हे सर्व विदारक दृश्य हरपाळदेवांना खूपच दुखवून गेले होते. त्यांचे मन युद्धात मिळालेल्या विजयाने सुखावण्याऐवजी अंतर्मुख होऊन विचार करू लागले होते.

आपल्या विजयी सेनेबरोबर हरपाळदेव भडोचच्या वेशीवर पोहचले तेव्हा साऱ्या स्त्री-पुरुषांनी त्यांचे स्वागत केले. गुजराथ देशांत सर्वत्र आनंदोत्सव साजरा होऊ लागला होता. परंतु हरपाळांचे मन मात्र या स्वागताचा स्वीकार करायला तयार नव्हते. विशालदेवांनी हरपाळांचे मन जाणले होते. आपला विचारी भावुक

पुत्र अस्वस्थ आहे याची त्यांना जाणीव झाली होती. त्यांना या उदासीन अवस्थेतून बाहेर काढण्यासाठी विशालदेवांनी करमणुकीची सर्व साधने उपयोगात आणली. नृत्यगायनाचे कार्यक्रम आयोजित करण्यात आलेत. हरपाळांना जुगार खेळण्याचा छंद होता, त्याचीही योजना करून पाहिली परंतु हरपाळ पुन्हा आपल्या तारुण्यसुलभ उत्साहित मुद्रेत परत आला नाही.

हरपाळदेव खूप दुखावल्यासारखे एकांतात राहू लागले. दुखणे खोल होते. त्यावर उपाय चालत नव्हते.

### दुःखद निधन

अशातच त्यांनी अंथरुण पकडले. लहानशा आजाराने त्याच्या शरीरातील त्राण नाहिसे झाले आणि त्यातच त्यांची प्राणज्योत मालवली.

साऱ्या गुजराथेत ही दुःखद वार्ता वाऱ्यासारखी पसरली. सिंघणावर विजय मिळवून देणारा पराक्रमी राजपुत्र निघून गेल्याच्या दुःखात सारा राजमहल बुडून गेला होता. गुर्जर प्रजाजन दुःखाने व्याकुळ झाले होते.

सर्व नगरजनांनी राजपुत्राच्या पार्थिवास स्मशानघाटाकडे रवाना केले. दुःखी अंतःकरणाने राजवाड्यातून स्मशान घाटाकडे जाणाऱ्या शवयात्रेतील लोक जीवाच्या आकांताने रडत होते.

### अघटित घडले : अचेतन शव चेतन झाले

शव सरणावर चढविण्यात आले. पांढऱ्या शुभ्र वस्त्रांनी झाकलेल्या राजकुमाराचे अंतिम दर्शन घ्यावे म्हणून विशालदेव सरणाजवळ गेले. राजकुमाराच्या तोंडावरील वस्त्र बाजूस सारण्यात आले तेव्हा राजकुमाराने डोळे उघडलेले आहेत, असे विशालदेवांना दिसले. त्यांचा आपल्या डोळ्यावर विश्वासच बसत नव्हता. राजसेवकांनाही कुमारांच्या डोळ्यांची ती जिवंत हालचाल दिसली आणि एकच ओरडा झाला. 'कुमरू जियाला : कुमरू जियाला' हा ध्वनी आकाशात गुंजत राहिला. डोळ्यातले दुःखाश्रू आनंदाश्रू झालेत. विशालदेवांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. शवयात्रा आनंदयात्रा होऊन नगराकडे परतली. मंगल वाद्ये वाजू लागली. 'कुमरू जियाला' हा ध्वनी आकाशात मावेना आणि नागरजनांच्या मनातील आनंद उर्मी आवरेना! हा दिवस होता शुक्रवार, भाद्रपद शुद्ध द्वितीयेचा!

### शवयात्रेची आनंदयात्रा

राजकुमार राजवाड्यात परतला. माता माल्हनदेवी आणि पत्नी कमलाईसा

यांनी आनंदाश्रूंनी त्याचे स्वागत केले. सर्व गुर्जर देश राजवाड्याकडे लोटला होता. रात्रभर आनंदाने नाचत होता. स्त्री-पुरुष गर्बा नृत्यांत रंगून गेले होते. रात्र संपत आली. परंतु त्यांचा उत्साह संपला नव्हता.

राजकुमाराचा हा दुसरा जन्मच होता. त्या जन्माचा हा दुसरा दिवस होता. सकाळी राजकुमार उठले ते पूर्वीसारखे मात्र वाटत नव्हते. पूर्वीसारखे बोलत नव्हते. त्यांच्या बोलण्यात पूर्वीसारखा विनोद दिसून येत नव्हता. त्यांच्या वयाला शोभेल असा उत्साह त्यांच्या वागण्यात राहिला नव्हता. जुने कलेवर घेऊन एक गंभीर महात्मा अवतरल्यासारखे वाटू लागले होते. ही शंका राजवाड्यातल्या अंतःपुरात घेण्यात येऊ लागली होती. तशीच ती वाड्याबाहेरच्या लोकांनासुद्धा आल्याची चर्चा होती. न्हाव्याच्या दुकानावर, पाणवठ्यावर आणि नदीच्या घाटावर अशी चर्चा सुरू झाली होती. लोक म्हणायचे की हा पूर्वीसारखा राजकुमार दिसत नाही. त्याच्या मृत शरीरात कोणत्या दुसऱ्या सिद्ध साधकाने तर प्रवेश केला नाही ना?

या चर्चेने बरेच मूळ धरले होते. खुद्द माल्हनदेवी आणि विशालदेव यांच्या मनातही या शंकेची पाल चुकचुकली होती.

विशालदेव चिंतेत पडले. राजकुमाराच्या हालचालीकडे ते बारकाईने पाहू लागले होते. आई माल्हनदेवी हरपाळदेवाच्या पूर्वीच्या सवयी दिसतात की नाही ते शोधत होत्या. या शंकासुराचा राजवाड्यात प्रवेश झाल्याचे राजकुमाराच्या नजरेतून सुटले नाही. म्हणून त्यांनी आपल्या पूर्वीच्या सवयी, लकबी आणि छंद कायम आहेत हे दाखवून देण्याची प्रत्येक संधी घेण्यास सुरुवात केली. तरीही विशालदेवांनी आपली शंका दूर करण्याच्या हेतूने माल्हनदेवीस सांगितले की, राणी कमलाईसाना सांगा की हरपाळदेवांना पूर्वायुष्यातील त्यांच्या एकांतातील प्रसंगांची आठवण आहे का ते पाहा.' त्याप्रमाणे राणी कमलाईसाने कौशल्याने हरपाळदेवांना पूर्वी घडलेल्या एकांतातील घटनाबद्दल विचारले. त्यावर हरपाळदेव म्हणाले, ''मला तूही परका समजू लागलेली दिसतेस. तू मला कितीही आठवणी विचार मी त्याचे यथास्थित वर्णन सांगेन. तिने विचारलेल्या सर्व आठवणींचे हरपाळदेवांनी यथास्थित वर्णन केले. कमलाईसाची खात्री पटली. तरीही ती म्हणाली, ''स्वामी! तुम्ही पूर्वीसारखे बोलत नाही. अवखळ विनोद करून हसत नाही. हसवत नाही. पूर्वी तुम्ही जुगार खेळायचे आता याचे नावही घेतले नाही.

त्यावर हरपाळदेवांनी पूर्वीपेक्षाही चांगले विनोद करून स्वतः ते हसत राहिले आणि राणीलाही हसवत राहिले. एके दिवशी ते जुगार खेळायला गेले. खूप खूप धन हरले. त्यांच्यावर जुगाऱ्यांचे उसनवार पैसे झाले. ते द्यायला हरपाळाकडे धन नव्हते. राजकोशातून मागण्यासाठी सकाळ व्हावी लागली असती. तोवर जुगारी थांबायला तयार नव्हते. म्हणून त्यांनी कमलाराणीस आपले दागिने देण्यास सांगितले. तिने नकार दिला. हे निमित्त साधून हरपाळदेव खूप उदास झाले. रुसून बसले. दुसरे दिवशी रामयात्रेच्या निमित्ताने विदर्भातील रामटेक येथे जाण्याचा हट्ट धरून बसले. विशालदेव त्यांना त्या विचारापासून परावृत्त करण्यासाठी म्हणाले, "तो देश शत्रूंचा आहे. तिथे तुम्ही जाऊ नये." परंतु हरपाळांचा हट्ट कायम राहिला. तो बालहट्ट होता तसाच तो राजहट्टही होता. तो पुरविल्याशिवाय थांबणारा नव्हता. शेवटी मातृहृदय पाझरले. माता माल्हनदेवी म्हणाल्या की चांगल्या बंदोबस्तासह यांना रामयात्रेला जाऊ द्या. हवा पालट होईल. मनःस्थिती पालटेल. यात्रेला जाऊ देणेच योग्य राहील. ठरले. रामयात्रेसाठी हरपाळदेवासह बरेच मोठे सैन्यदल देण्यात आले. राजवैभवाला साजेल असा लवाजमा देण्यात आला.

**अंतहीन यात्रेचा प्रारंभ**

सैन्यदलासह हरपाळदेवाची स्वारी रामयात्रेला निघाली होती. ही त्यांची अंतहीन यात्रा होती. त्यांनी यानिमित्त गुर्जर देशाचा अन् स्वकीयांचा संबंध कायमचा तोडला होता. 'स्वसंबंधीयांचा संबंध तो विशेषतः त्याज्य', म्हणून शिष्यांना सांगणारा हा राजकुमार अनिकेत गोसावी होण्यासाठी राजवाड्याबाहेर पडला तो कायमचाच!

त्यांना वैराग्याचे एकटेपण हवे होते. राजवैभवी लवाजमा, सैन्य दळ किंवा लौकिक थोरत्वाच्या इतर खुणा सोबत नको होत्या. त्यामुळे दर मुक्कामी योजनाबद्ध पद्धतीने त्यांनी सैनिक परत केले. त्यांची ती 'एकला चलोरे'ची विजय यात्रा होती. 'एकला विजय' हे त्यांचे उपदेशाचे सूत्र ते आचरत होते, त्यामुळे प्रत्येक मुक्कामावरून ते काही सैनिक क्षेमकुशल कळविण्याचे निमित्ताने भडोचकडे पाठवीत असत. असा त्यांनी देऊरवाडा (जि. अमरावती) येथे येईपर्यंत सर्व योजनापूर्वक दळभार परत केला होता. परंतु शेवटी दोन स्वामिभक्त परत जायला तयार नव्हते, म्हणून त्यांचे सोबत राहिले होते. ते हरपाळदेवांना दोघांमध्ये झोपवीत व दोघे दोन

स्वामी या मुक्ताबाईची ओळख सांगतांना म्हणतात, "विक्रमादित्याची जाया : भर्तृहरीची भावजय : अचलपूरच्या राजाची कन्या : गोरक्षनाथाची शिष्याः" अशी ही मुक्ताबाई महायोगिनी होती. तिने सालबर्डी येथे येऊन स्वामींचे दर्शन घेतले होते.

स्वामी सांगतात की ती फार तपस्वी होती. डोईचे केस वाढलेले अन् नखांच्या चुंभळ्या झालेल्या होत्या. अशी ती महान तापसी होती.

श्रीचक्रधर स्वामीसुद्धा या एकांत काळात आत्यंतिक विरक्त अवस्थेत राहत असत.

## "सुनिया परी होऊनि असावे"

स्वामी या काळात वस्त्रविहीन अवस्थेत राहत असत. त्यांना पांघरुण कोण देणार? आकाशाचे छत हेच पांघरुण आणि भूमी हेच अंथरुण होते. थंडीचे दिवस होते. त्यांनी एका गावाशेजारी एका उकिरड्यावर एक कुत्रा झोपलेला पाहिला. त्याने उकिरडा उकरून छान उबदार जागा केली होती. त्यात पाय दुमडून तो कुत्रा निवांत झोपला होता. इतक्यात तो स्वतः त्या खड्ड्यांतून उठून, अंग फडफडवून निघून गेला. त्या रिकाम्या खड्ड्यात स्वामी जाऊन झोपले. दोन्ही पाय दुमडून घेऊन हात आत ओढून तेवढ्याच उबदार घरात त्यांनी डोळे मिटून झोप सुरू केली. पहाटे पहाटे खड्ड्यात टाकायला राख घेऊन येणारे त्या उकिरड्यावर राख टाकीत होते. ती गरम-गरम राख पडल्यामुळे स्वामी सांगतात, "जवं जवं सोहमी-सोहमी उन्हराख लागे तवं तवं हे घरघरा घोरे :" गरम गरम राख अंगावर पडल्यामुळे स्वामींना गाढ झोप लागली होती. उजाडल्यावर उकिरड्याजवळ काही लोक गोळा झाले होते. ते तेथे गावगप्पा करू लागलेत. तेव्हा स्वामींना जाग आली. ते उठले. अन् तडक पळू लागले. गोळा झालेले लोक आश्चर्याने पाहत राहिले व म्हणाले, "उकिरडा व्याला : उकिरडा व्याला".

## देहासक्ती निमाली

त्यांची देहासक्ती पार निमाली होती. त्यांना जगण्याचे भानही उरलेले नव्हते. एकदा ते नदीकाठी एका गवताच्या ढेकळावर बसले होते. ते ढेकूळ गवताने झाकले होते. मातीचे ते ढेकूळ स्वामींचे भाराने पाण्यात कलंडले. ढेकळाबरोबर स्वामीही पाण्यात कलंडले. परंतु त्यांनी हालचाल केली नाही. ते प्रवाहाबरोबर वाहत गेले. पुढे एका नदीकाठच्या गावातील लोक नदीचा पूर पाहण्यासाठी

जमले होते. त्यांनी पाण्यावर तरंगत येणारे स्वामींचे शरीर पाहिले. त्यांना हे प्रेत वाहत येत असले पाहिजे असे वाटले. ते ओरडू लागले. 'प्रेत रे प्रेत' असा एकच गलका झाला. तेव्हा स्वामींना जाग झाली. त्यांनी नदी किनाऱ्यावरच्या काटीस पकडले. त्या काटीच्या आधाराने वर आले अन् चालू लागले. तेव्हा त्यांचे कंमरेचा पदर पाण्यात वाहून गेला होता. ते विवस्त्र होते. दिगंबरावस्थेतील हे अनिकेत आपल्या मार्गाने निघून गेले. अशा आत्यंतिक विरक्तावस्थेत स्वामी राहत होते.

## वनवासी जनात निवास

विंध्य पर्वताच्या कुशीत राहणाऱ्या गोंडांच्या सहवासात ते राहत. स्वामींची लोभस अंगकांती व सात्विक व्यक्तिमत्व पाहून ते लोक त्यांचेवर प्रेम करीत. त्या गोंड लोकांना हे आपले दैवत वाटू लागले होते.

स्वामी त्यांचे वस्तीत जात तेव्हा ते आनंदाने 'किलुकिलु करून' फेर धरून नाचत असत-गात असत. स्वामींना मध आणि भात जेवू घालीत असत. एका द्रोणात मध आणि दुसरे द्रोणात पाणी आणि पत्रावळीवर भात घालीत. वेळुच्या कांड्यात तांदूळ घालून ते जमिनीत पुरत असत. त्यावर जाळ करुन तांदूळ शिजवत असत. तो वनवासी लोकांनी तयार केलेला भात मधासह खाण्याची मेजवानी होती. ते लोक स्वामींना दंडवत घालीत. श्रीचरणावर माळा ठेवीत. वनपुष्पांनी स्वामींची पूजा करीत आणि दुधीकरटा भाताची आरोगणा देत. स्वामी आले की नाचत-गात. महोत्सव करीत. स्वामी त्या लोकांत मिसळत असत. राहात असत.

## नग्नदेव - गोमटदेव

स्वामी विरक्तावस्थेत होते तरीही त्यांचे मूळ रूप आणि लावण्य झाकल्या जात नव्हते. त्यांचे तेजस्वी डोळे, त्यांची घडीव शरीरयष्टी पाहून कुणीही आकर्षित होत असे. एकदा स्वामी रामटेकच्या भोगरामाचे मंदिरात आले होते. तेथे एक ब्राह्मणबाई रामदर्शनासाठी आली होती. तिने स्वामींना पाहिले. एक सुंदर आकर्षक तरुण पुरुष विवस्त्र अवस्थेत पाहून ती वरमलीच! दुसरेच क्षणी या विरक्त महापुरुषाला नमस्कार करून ती म्हणाली, "बाबा! आपले नाव काय? स्वामीचे मुखमंडलावर केवळ स्मित हास्य पसरले. ते बोलले नाहीत. त्यांची ती अवस्था पाहून ती बाई स्वामींना म्हणाली, "काय आपण नगीनदेव आहांत?" स्वामींनी

जूला झोपत. तिघांच्याही अंगावर एकच पांघरुण घेत. त्यामुळे हरपाळांना त्या घांपासून सुटका करून घेणे अवघड होते. परंतु देऊरवाड्याच्या काजळेश्वराचे देरात ते झोपले असताना हरपाळदेवांनी आपली अलगद सुटका करून घेतली. गावरची सर्व राजवस्त्रे काढून ठेवलीत. अलंकारही काढून ठेवले आणि हा ष्कांचन अनिकेत गोसावी काजळेश्वराचे मंदिरातून निघून गेला केवळ दोन स्त्रांसह!

## ह गोविंदप्रभुचे दर्शन

ते सकाळी रिद्धपूर नगरात पोहचले. रिद्धपूरला श्रीप्रभु उपाख्य श्री गोविंदप्रभु हत होते. रिद्धपूर हे समृद्ध नगर होते. तेथे सोहनहाट होता. सोहनहाट म्हणजे ाजचा सराफा बाजार! तसाच रांधवनहाटही होता! रांधवनहाट म्हणजे हलवायांची कानेे. हरपाळदेव नगरातून फिरत फिरत रांधवणहाटात आले. रांधवण हाटात का हलवायाचे दुकानांत बसून श्रीप्रभु काही खात होते. हरपाळदेवांना पाहून प्रभूंना आनंद झाला होता. त्यांनी हातातले शेंगुळेबुड्डे हरपाळदेवांच्या दिशेने कून म्हटले - ऐया माझा जाला म्हणे : आता होय म्हणे : ''होय म्हणे : चक्रेया य म्हणे : चक्रधरू होय म्हणे''.

## वस्थांतर झाले

या प्रसादवत नामांतरासरशी हरपाळदेवाचे अवस्थांतर झाले. ते आता पाळदेव राहिले नव्हते. ते श्रीचक्रधर झाले होते. अवस्थांतराने त्यांचे देहभान वले गेले होते. पाय पडतील तिकडे ते चालू लागले. रिद्धपूरच्या पूर्वेकडच्या हाद्वारातून ते पुढे निघाले. जणु सत्यार्थ प्रकाशाच्या शोधासाठी सूर्य-प्रकाशाच्या शेने ते निघाले होते.

श्रीचक्रधर नामाचा स्वीकार करून निघालेल्या हरपाळदेवांचे गौरांग रेखीव ते. त्यांचे औदासिन्य इतके पराकोटीचे होते की चालण्याची प्रवृत्ती असेल तरच पुढे पाऊल टाकीत. अन्यथा जागच्या जागीच थांबत. रात्र होईपर्यंत ते केवळ कि. मी. अंतरावरील तळेगांव या गावी पोहोचले. रात्री तळ्याचे पाळीवर सावले.

दुसरे दिवशी ते पुन्हा चालू लागले. त्यांना चालण्याची प्रवृत्ती असेल तेव्हा रस्त्याने चालत. प्रवृत्ती नसली तर अरण्यात शिरत. त्यांच्या अंगावरचे वस्त्र ाट्यात गुंतून पडे, तेव्हा ते तेथेच थांबत. वारा येऊन ते निघाले तरच पुढे पाऊल

टाकीत किंवा कुणी वाटसरू येऊन काढून देईल तेव्हा ते पुढे पाऊल टाकीत. त्यांचे गौरांगावर काट्यांचे ओरखडे पडत. त्यातून रक्त निघायचे. ते रक्तबिंदू तिथेच वाळत. लीळाचरित्रकार लिहितात, ''काटेयाचे ओरखंडे जाती : तेथ असुधाचे बींदु निघति : ते श्रीमूर्तीवरी वाळती : जैसा का माणिके : मोतीये : रत्ने : खेवणिती असती : तैसी बाहुप्रदेशी मिरवीती : जैसी पन्हरेयावरी टीक ऐसी मीरवति :'' ही अवस्था स्वीकारून श्रीचक्रधर पाय नेतील तिकडे जात होते. ते सालबर्डीच्या पायथ्याशी असलेल्या पाळे या गावात पोहचले. रात्री तेथे विसावले. तेथून सकाळी त्या पर्वताचे दृश्य पाहून पुढे चालू लागले. या सालबर्डीचे डोंगरात ते वनवासी जनांसोबत राहत. त्यांचे सोबत जेवत. वनवासी लोक त्यांचेभोवती नाचत. स्वामी वन्य जातीसोबतच वन्य जीवाशीही खेळत. भूमी हीच त्यांची शय्या होती. 'खडेया गोटेया पहुडु स्वीकरीती :' असे महींद्रभट्टांनी या अवस्थेचे वर्णन केलेले आहे. या अवस्थेत १२ वर्षे या पर्वतावर त्यांनी निवास केला.

## निसर्गरम्य सालबर्डी

सालबर्डीचा निसर्ग रमणीय आहे. उंच उंच पर्वतकड्यांच्या मधून झुळझुळ वाहणारी माडु नदी. या नदीला येऊन मिळणारी गंगा! गंगाच ती! महादेवांच्या जटेतून निघालेली ही गंगा इथल्या महादेवाच्या भुयारातून येऊन माडूला मिळते. या दोन जलौघांच्या संगमावर एका उंच टेकडीवर एक पांडवलेणी होती. आजही आहे. तेथे निवांत राहण्याची सोय होती. त्या लेण्यात श्रीचक्रधर विसावले असतील. या लेण्याचेवर आज एक मंदिर आहे. तेथे पूर्वी स्वामींच्या पदस्पर्शाने पुनीत झालेली एक शिळा होती. तेथे ते बसत. डोंगरदऱ्यात राहणाऱ्या श्वापदांच्या सहवासात ते रमले होते.

## तपस्विनी मुक्ताबाईशी भेट

एक दिवस त्या डोंगरात महायोगिनी मुक्ताबाई आपले साधनास्थान सोडून आली. ती एका प्राचीन मंदिरात थांबली होती. तिची आणि स्वामींची भेट झाली. ती समोर आली. दर्शन होताच तिला वेध निर्माण झाला. तिने दंडवत घातले. 'श्रीचरणा लागौनि वीनवीले!'' जी : जीः माझी येथे एक कुटी आहे. तेथे चालावे. स्वामी तेथे गेले. मुक्ताबाईनी स्वामींची वनपुष्पांनी पूजा केली. फळे अर्पण करून ती म्हणाली, ''स्वामीजी : आज माझे तपाचे फळ मला मिळाले. माझी तपस्या तुमचे दर्शनाने पूर्ण झाली.''

होकारार्थी मान हलविली. ती म्हणाली, ''आम्ही आपणाला नगीनदेवच म्हणू.'' बाई स्वामींना घरी भोजन करण्याचा आग्रह करून म्हणाली, ''बा नगीनदेव हो, तुम्ही इथे असाल तोवर माझेकडेच जेवावे जी :'' स्वामींनी हसून रुकार दिला. त्यांचा रुकारही नकारच असायचा. कारण ते कुठेही फार काळ थांबत नसत. त्यांची ही परिभ्रमणाची अंतहीन यात्रा होती.

**शत्रू मित्र होती.**

श्रीचक्रधर स्वामी एकदा सालबर्डीच्या जंगलात बसलेले असताना एक पांढरा शुभ्र ससा त्यांचेकडे जीवाच्या आकांताने धावत आला. त्याला श्वास भरून आला होता. नाक फुरफुरत होते. तो मुका प्राणी स्वामींना काही सांगू शकत नव्हता. परंतु तो घाबरलेला आहे हे त्याच्या अवस्थेवरून स्पष्ट दिसत होते. तो स्वामींचे मांडीखाली येऊन बसला. या लहानशा प्राण्याची अवस्था पाहून स्वामींनी त्याला आंजारले-गोंजारले. इतक्यात या सशांमागून दोन शिकारी कुत्रे समोरून धावत आले. ते सशाचा पाठलाग करीत होते. ते स्वामीजवळ येऊन भुंकू लागले. सशाला पकडायला आलेले हे हिंस्र श्वान स्वामीभोवती गरगरा फिरू लागले. भुंकू लागले. हे कुत्र्यांचे भुंकणे ऐकून हातात बाण घेतलेले दोन पारधी स्वामींचे समोर येऊन उभे राहिले. त्यांना स्वामींचे मांडीखाली दडलेला ससा दिसला. ते म्हणाले, ''महाराज! हा आमचे होडेचा ससा आहे. ही आमची शिकार आहे. कृपया ती सोडावीजी :'' त्यावर स्वामींनी म्हटले, हा आम्हांला शरण आलेला आहे. येथे शरण आलेल्याला मरण नाही. तुम्ही याचा नाद सोडा. हा लहानसा मूक प्राणी जंगलचा चारा खातो. जंगलचे पाणी पितो. तुमचे काय घेतो? याला कशाला मारता?''

स्वामींचा हा उपदेश ऐकून आणि त्यांच्या डोळ्यातील कृपाकिरणांच्या प्रभावाने ते हिंस्र स्वभावाचे पारधी पार बदलून गेले. ते म्हणाले, ''महाराज! आपण आमचे डोळे उघडले. आजपासून आम्ही अशा गरीब प्राण्यांची शिकार करणार नाही.'' स्वामींनी त्यांना आशीर्वाद दिला आणि ते आणि त्यांची कुत्री गेल्यावर स्वामी सशाला म्हणाले, ''जा आता. जंगलचा चारा खा, नदीचे पाणी प्या निर्भय व्हा, आता हे पारधी तुमचे शत्रू राहिले नाही. जा.''

**सर्प न खाती**

स्वामी एकदा भुजंगाच्या वडनेरला गेले होते. तेथे दोन मोठी मंदिरे होती.

एक वटेश्वराचे आणि दुसरे उत्तरेश्वराचे! स्वामी वटेश्वराचे मंदिरात सायंकाळपर्यंत बसलेले होते. सायंकाळी आरती झाल्यावर तेथला पुजारी स्वामीजवळ आला आणि वंदन करून म्हणाला, ''महाराज आपण आता जावे. मी आता मंदिराचे दारास साखळी घालून त्यास कुलूप लावून गावात जातो. इथे आपणांला राहता येणार नाही, स्वामी त्या वटेश्वराचे मंदिरातून उठले आणि उत्तरेश्वराचे मंदिरात शिरले. आणि विसावले.

रात्री दोन मोठे भुजंग फुत्कार टाकीत मंदिरात शिरले. त्या दोघात तुंबळ युद्ध सुरू झाले. ते दोन्ही एकमेकावर तुटून पडले होते. त्या लढाईत ते स्वामींचे छातीवर येऊन आदळले. स्वामींनी त्यातल्या एकाला उजव्या हातात धरले आणि दुसऱ्याला डाव्या हातात धरले. स्वामींनी दोघांकडेही आपल्या स्नेहार्द्र कृपादृष्टीने पाहिले. स्वामींची कृपादृष्टीची किरणशलाका अंधाराला चिरून भुजंगाच्या डोळ्यात शिरली होती. त्या दृष्टिपाताने ते महाभुजंग निर्वैर झालेत आणि त्यांना स्वामींनी दोन बाजूंनी सोडून म्हटले, ''जा आता. पुन्हा असे भांडू नका. वैर सोडा आणि मैत्री करा. हे मंदिर वसते करा.'' स्वामींची ही वैखरीच्या पलीकडची परावाणी त्या मुक्या प्राण्यांना कळली आणि त्यांनी आपले वैर कायमचे सोडले. पुन्हा त्या मंदिरात ते भांडायला आले नाही. ते मंदिर पांथस्थाकरिता वसते केले. या वडनेरला तेव्हापासून आजतागायत भुजंगाचे वडनेर असेच म्हणतात. स्वामींचे शिष्य रामदेव उपाख्य दादोस याच गावचे होते.

**व्याघ्रही न खाती**

स्वामी भंडारा जिल्ह्यातील 'सुकळी' नावाच्या गावी गेले होते. तेथे जंगलात डाकरामाचे मोठे मंदिर होते. ते गावाबाहेर असल्यामुळे पुजारी तेथे राहत नसे. तो सायंकाळी तेथून निघून गावात जात असे. स्वामी तेथे निवाऱ्यासाठी थांबले होते. पुजारी सायंकाळी गावात जायला निघाला तेव्हा तो स्वामींना म्हणाला, ''स्वामींजी आता आपण तेथे थांबू नये. येथे रोज एक हिंस्र वाघ येतो. येथे थांबणाऱ्या यात्रिकाचे सकाळी आम्हांला दर्शन होत नाही. त्याचे येथे रक्त सांडलेले दिसते. तेव्हा आपण येथे थांबू नये हे बरे!

स्वामींनी त्याच्या या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. आणि ते त्या डाकरामाच्या मंदिरात थांबले. खरेच रात्री वाघ आला. त्याच्या भयावह डरकाळ्यांना प्रत्युत्तर देण्यासाठी स्वामींनी सिंहनाद केला. त्या हिंस्र वाघाला ती चेतावणीच होती.

स्वामींनी त्याला तेथे परत न येण्याची ती आज्ञाच या सिंहनादातून दिली होती. त्या दिवसापासून तो वाघ परत या मंदिराकडे फिरकला नाही. ते मंदिर येणाऱ्या जाणाऱ्या पांथस्थासाठी उघडे झाले. आजही तेथे यात्रा भरते. अनेकांची दुःखे हरण करण्याचे सामर्थ्य स्वामींच्या या स्मृतिस्थानात आहे.

## हिंस्र म्हैसा निर्वैर केला

श्रीचक्रधरांचा हा एकाकी संचार सुरू होता. असेच एकदा एका गावातून जात होते. ज्या वाटेने ते निघाले होते त्या वाटेवर एक रानहेला होता. तो वाटसरूंना मारून टाकायचा. त्यामुळे गावकरी तिकडे जाणाऱ्या वाटसरूंना तिकडे जाऊ नये म्हणून सांगत असत. तिकडे निघालेल्या स्वामींना गावकरी लोकांनी तिकडे जाऊ नये म्हणून सांगितले. तिकडे एक रानम्हैसा आहे. तो माणसाला मारतो असेही सांगितले, त्यावर हा निर्भय महापुरुष केवळ स्मितहास्य करून पुढे निघाला.

काही अंतरावर जाताच तो म्हैसा धावतच आला. डरकाळ्या फोडत तो स्वामींचे अंगावर धावून पडला. स्वामींना शिंगावर घेऊन क्षणार्धात त्यांना लोळवून, तुडविण्याइतकी ताकद त्या रानहेल्यात नक्कीच होती. तो चवताळून अंगावर येत असलेला रानहेला पाहून स्वामी निश्चलपणे उभे राहिले. आपल्या कृपादृष्टीतील किरणशलाकांनी त्या पशूची दृष्टीच बदलविण्याची शक्ती स्वामीत होती. त्यांनी आपल्या कृपाकटाक्षाने रानहेला निर्वैर केला. तो नम्र होऊन स्वामींकडे पाहात उभा राहिला. स्वामींनी त्याला निर्वैर होऊन राहा अशी जणू आज्ञाच दिली होती. त्याला जंगलात निघून जाण्याची अनुज्ञा दिली. ही पशूंच्या स्वभावपरिवर्तनाची किमया करणाऱ्या स्वामींची परिवर्तनयात्रा आता मानवी स्वभावाच्या दिशेनेही वळली.

## निरक्षराला साक्षर केले.

स्वामी जात होते त्या वाटेवर एक अज्ञात गाव लागले. त्या गावात एक मठ होता. त्या मठातील महंत वारले होते. त्यांचे दोन शिष्य होते. त्या शिष्यांपैकी दोघेही मठांच्या महंतीवर आपला हक्क सांगू लागले होते. हे भांडण गावातील महाजनांकडे नेण्यात आले. गावातील थोर-थोर महाजन आणि विद्वान ब्राह्मण वाद मिटविण्यासाठी एकत्र आले. महाजनांनी दोघांची बाजू ऐकून घेतली. दोघेही आपलाच हक्क कसा ते सांगू लागले. त्यावर महाजनांनी एक युक्ती केली ते म्हणाले जो मठातील पोथ्या-पुस्तके वाचू शकेल तोच पूर्वीच्या महंताचा

उत्तराधिकारी होऊ शकेल. पुस्तके आणली गेलीत. त्यातील एकाला पुस्तके वाचता आली नाही. दुसऱ्याने वाचली. महाजनांनी वाचणाऱ्याला मठ दिला. दुसऱ्याला मठाबाहेर काढला. वास्तविक वाचू शकणारा शिष्य हा गुरुचा आज्ञाधारक शिष्य नव्हता. तो सतत बाहेर फिरणारा होता. उलट ज्याला मठाबाहेर काढले तो गुरुंचा आज्ञाधारक नम्र शिष्य होता. तो मठ चालवू शकणारा खरा उत्तराधिकारी होता. परंतु तो बिचारा आता निराश्रित होऊन दुःख करू लागला होता. एका झाडाखाली बसून तो रडत होता. इतक्यात एक दिव्य सत्पुरुष आपल्याकडे येत आहे असे त्याने पाहिले आणि तो स्वामीकडे आला. दंडवत-प्रणाम करून पाणावलेल्या डोळ्यांनी दुःख करीत तो म्हणाला, "महाराज, हा समोरचा मठ माझा आहे. गावकऱ्यांनी मला तेथून काढून दिले. मला पोथ्या वाचता येत नाहीत म्हणून, मला निराश्रित व्हावे लागले. महाराज, मला आता कोणाचा आश्रय नाही. कोठेही थारा नाही. आपण मला मदत करा. मी या मठाचा खरा उत्तराधिकारी आहे. मी माझे गुरुची प्रामाणिकपणे सेवा केली व धर्माने वागत आलो. "एथ शरण आलेया काही मरण असे" असे स्वामींचे ब्रीद होते. त्यानुसार स्वामींनी त्या निराश्रितास अभय दिले. त्याला घेऊन ते परत महाजनाकडे गेले. महाजनांना स्वामींनी सांगितले की हासुध्दा पोथ्या वाचू शकतो. तुम्ही त्याला पुन्हा वाचण्याची संधी द्या व या मठात बसवा.

महाजन म्हणाले, "याला वाचता येत नाही. हे आम्ही पाहिले."

"यालाही वाचता येते" - स्वामी.

"चला तर पुन्हा परीक्षा घेऊ" - महाजन.

या अपात्र ठरविलेल्या शिष्यासह सर्वजण आत गेले. अपात्र ठरविलेल्या शिष्याचे हातात पुस्तक दिले.

त्याला उद्देशून स्वामी म्हणाले, -

"वाचा. तुम्हांला वाचता येते. वाचू लागा."

आश्चर्य घडले. तो निरक्षर साधू पुस्तक वाचू लागला.

महाजनांची खात्री झाली.

त्याला मठात पुन्हा प्रतिष्ठित केले. त्या साधूने स्वामींना साष्टांग दंडवत केले. त्यांच्या उपकाराची परतफेड म्हणून त्यांनी स्वामींना मठात थांबवून घेतले. एक दोन दिवस झाल्यावर स्वामी जायला निघाले. परत त्याने आग्रह केला. परत

स्वामी थांबले. असे दोनचारदा झाल्यावर स्वामी अक्षरशः त्याच्याशी लटके भांडण करून निघाले. ते सांगतात,

"आम्ही त्याच्याशी भांडून मठातून निघालो." या लीळेत स्वामींनी अक्षरशत्रू असलेल्या परंतु साधुत्वास पात्र अशा मनुष्यास सामर्थ्यसंपन्न केले. एका निरक्षरास आपल्या आशीर्वादपर प्रेरक सूचनेने साक्षर केले.

**भट्टो मागील फाकी पाहीजे**

ही भंडारा नगरातील गोष्ट आहे. तेथे एक विद्वान अभ्यासक ब्राह्मण होते. ते ग्रंथ वाचन करीत होते. ग्रंथाची पाने उलटवित होते. कोणता तरी निर्णय शोधीत होते. परंतु तो निर्णय सापडत नव्हता. त्याच वेळी त्याच्या दारात श्री चक्रधरस्वामी उभे राहिले. ते म्हणाले,

"भट्टो, मागील फाकी पाहीजे!" स्वामींचे ह्या वाक्यामुळे नीलभट्ट भांडारेकारानी रस्त्याकडे पाहिले. समोर एक दिव्य अन् तेजस्वी नेत्राचा सत्पुरुष उभा होता. लंब कर्ण, आजानुबाहू, गोरापान तरुण साधू पाहून नीलभट्ट प्रभावित झाले. साधूंनी सांगितल्याप्रमाणे ग्रंथातील मागील पान उघडले.

भांडारेकार थक्कच झाले. बराच वेळ ते ग्रंथाची पाने इकडून-तिकडे पाहत होते. परंतु त्यांना हवे ते सापडत नव्हते. त्यांना त्या ग्रंथात ईश्वर पुरुषाची लक्षणे शोधावयाची होती. ती समोरच्या साधुपुरुषाने रस्त्यावरूनच सांगितलेल्या पानावर भांडारकारांना आढळली होती. त्यांना आश्चर्य वाटले. ते ईश्वराचे एक-एक लक्षण वाचू लागले आणि समोर पाहू लागले. समोर उभ्या ठाकलेल्या श्रीमूर्तीत ग्रंथात दिलेली ईश्वरीपुरुषाची लक्षणे प्रत्यक्षात दिसत होती. ग्रंथातील लक्षणे तंतोतंत जुळणारे व्यक्तिमत्व समोर उभे ठाकलेले पाहून भांडारेकार मनात म्हणाले, 'हेच ईश्वरी पुरुष आहेत.'

"हा तरुण साधू साधा-सुधा साधू नसून हा प्रत्यक्ष परमेश्वरावतार आहे. याची त्यांना खात्री पटली. इतक्यात हा साधु पुढे निघाला. भांडारेकारांना वेध लागला होता. तेही उठले आणि रस्त्यावर आले. ते साधूचे मागे जाऊ लागले. त्यांची पत्नी घरातून दारात आली. आणि साधूचे मागे जात असलेल्या आपल्या पतीस म्हणाली, "भट्टो! स्नानाचे पाणी काढले असे हो!" ते थंड होईल. आत या आणि स्नान करा. ते म्हणाले, हे इतके दिवस तुमचे ताब्यात होते. आता जयाचे तयासोबत निगाले." भांडारेकारांना श्रीचक्रधरांचे दर्शनाने साक्षात्कार

झाल्याचा प्रत्यय आला होता. ते आता पाण्याने बाह्यांग शुद्धीसाठी थांबण्याऐवजी जीवात्म्यावर साचलेल्या अज्ञानाचे मळांस स्वच्छ करणाऱ्या महान विचारांच्या स्नानाने अंतिम शुद्धीच्या शोधात निघाले होते. ते परत घराकडे वळले नाही. ते स्वामींचे सहचर झाले होते. त्यांच्या अंतिम श्वासापर्यंत स्वामींचे सोबत राहणारा हा पहिला अनुसरलेला शिष्य होता, पं. निलभट्ट भांडारेकार!

**भांडारेकारांची भक्ती**

निलभट्ट भांडारेकार स्वामीसोबत निघाले होते. त्यांनी सोबत काहीही घेतले नव्हते. अंगावर केवळ एक धोत्र होते. ते धोत्र सोळा हात लांब होते. स्वामीसोबत भांडारेकार देवकी तळ्याचे पारावर गेले. त्यांनी स्वामींना बसायला आसन करण्यासाठी आपले धोत्र अर्धे फाडले. त्याचे आसन केले. स्वामींना त्या आसनावर बसविले, आपण समोर पाय दुमडून बसले. स्वामींना भिक्षान्नाचे भोजन झाले. भांडारेकारांनी उरलेल्या अन्नाचा प्रसाद घेतला.

अशावेळी भांडारेकारांच्या मनात विचार आला की मी निघताना काही द्रव्य घेतले नाही. जवळ काहीच नव्हते. मी स्वामींची पूजा केली असती. श्री चक्रधर स्वामींनी त्याचे हे मनातील विचार ओळखले. स्वामी म्हणाले, ''भट्टो! तुमचे मनोरथ आम्ही पूर्ण करू. हे ऐकून भांडारेकारांची स्वामीवरची भक्ती अधिकच दुणावली. दर्शन होताच त्यांचे मनात ज्ञानत्व, सुहृदत्व, हीतक्षत्व हे तिन्ही गुण निर्माण झाले होते. आता ज्ञातृत्व, आप्तत्व आणि प्रतीती ह्या तिन्ही गुणांची त्यात भर पडली.

**भांडारेकारांचे स्तुतिस्तोत्र**

निलभट्ट हे भंडाऱ्याहून स्वामीसोबत निघाले. ते गावा–गावातून भिक्षा मागून आणीत. प्रथम स्वामींना भोजन वाढत असत. त्यानंतर उरलेले अन्न स्वत: प्रसाद समजून जेवीत असत. रात्री स्वामींना झोपण्यासाठी उत्तम अंथरूण टाकीत. अशी स्वामींची सेवा करीत असत. स्वामी झोपल्यावर स्वत: एखाद्या कोपऱ्यात किंवा एखाद्या देवळीत पाय दुमडून झोपत. एके दिवशी कन्हान नदीच्या पात्रातील खडकावर भांडारेकारांनी स्वामींना भोजन वाढले. त्यानंतर त्यांच्या झोपण्यासाठी आसन टाकू लागले. त्यावेळी त्यांना एक विंगुळी चावली. खूप वेदना होऊ लागली. त्यांनी स्वामींना सांगितले की त्यांना विंगुळी चावली असून खूप अंगार होत आहे. ही अंगार कमी व्हावी म्हणून त्यांनी स्वामींना विचारले, ''जी : जी:

स्तुती करू.'' स्वामींची आज्ञा घेऊन त्यांनी स्तुती सुरू केली. त्यांचे ते स्तुतिस्तोत्र ''विंगुळी स्तोत्र'' म्हणून पंथात आजही प्रसिद्ध आहे. ते जसेजसे स्तुती करू लागले तसतशी विंगुळीची अंगार कमी होऊ लागली. विंगुळी उतरल्यावर त्यांनी स्वामींना दंडवत घातले. श्री चरणावर लोटांगण घातले. तेथून सकाळीच स्वामीसह भांडारेकार पुढे निघाले. निलभट्ट स्वामीसोबत सतत १६ वर्षे राहिलेत. स्वामी बाइसाला म्हणतात, ''बाइ, भांडारेकारा सोळा वर्षे सन्निधान परी पृष्ठभाग कधी देखलाची नाही.'' ऐसे ते भांडारेकार योग्यतेचे शिष्य होते.

## धानुबाईची रत्नपूजा निलभट्टाचे द्वारा

स्वामीची पूजा करण्याची इच्छा असलेल्या निलभट्टाची इच्छा पूर्ण करण्यासाठी जणू स्वामी अचलपूरला गेले. तेथे ते पिंगळभैरवाच्या मंदिरात थांबले होते. तेथे स्वामी भांडारेकारांना म्हणाले, ''भट्टो! तुम्हांला पूजा करण्याची इच्छा आहे. ते आमचे लक्षात आहे.'' त्यावर भांडारेकार म्हणाले, ''आमचेकडे द्रव्य नाही, हेही स्वामी जाणतात. स्वामी स्मितहास्य करून म्हणाले, ''तू उभा ठाकला पूरे : सिध्दीते एथौनि नईजैल की :''

एके दिवशी स्वामी निर्वाणेश्वराचे मंदिरात गेले होते. तेथे स्वामींनी भांडारेकारांना म्हटले, ''भट्टो, तुम्ही या देवळात बसा. आम्ही पलिकडच्या देवळात जाऊ, तुम्हांला कोणी काही म्हणैल ते तुम्ही करा.'' असे म्हणून स्वामी निर्वाणेश्वराचे मंदिराचे पलिकडील बहिरवाच्या मंदिरात गेले.

निर्वाणेश्वराची भक्ती करणारी धानाईसा तेथे आली. धानाईसा ही तेथल्या नेमाळ पांड्यांची पत्नी होती. ते पंचकुळीचे भांडारी होते. त्यांचेकडे राजकोश होता. ते कोशाधिकारीच होते. त्यांची राणी धानाईसा पालखीत बसून निर्वाणेश्वराचे मंदिरात आली. तिने देवाची पूजा केली. तेथील ब्राह्मणांना दानदक्षिणा दिली. आणि ती बाहेर आली. तेथे चौकात बसलेल्या भांडारेकारांचेकडे तिचे लक्ष गेले. त्यांना धानाईसाने नमस्कार करून विनंती केली की, आपण आमचे आवारात चलावे. आवारात गेल्यावर भांडारेकारांना तिने आसनावर बसविले. तिने ताट भरून पूजा-द्रव्ये आणली. ती पूजा पाहून निलभट्ट म्हणाले, ''हे काय?

''आम्हांस तुमची पूजा करावयाची आहे.''-धानाईसा

''अशी पूजा आमच्या स्वामींची करा''-निलभट्ट

''तुमचे कुणी स्वामी आहेत कां ?

ते कुठे आहेत? ते सांगा. आम्ही त्यांना बोलावू''-धानाई

''ते तुमच्या बोलाविण्याने येणार नाहीत. आम्हीच त्यांना बोलावू''-निलभट्ट

निलभट्टांनी स्वामींना जाऊन सांगितले व आपण तेथे चलावे अशी विनंती केली. स्वामींनी विनंती मान्य केली. ते धानाईसाकडे आले. धानाईसाने स्वामीकडे पाहिले. तिला ते दिव्य दर्शन घेतल्यामुळे आनंदाचे भरते आले. ती भारावून गेली होती. तिने त्यांचेसाठी चांगले आसन रचले. पूर्वीपेक्षा उत्तम पूजा द्रव्ये आणली. स्वामींची पूजा करण्यासाठी धानाईसा पुढे आली. तेव्हा स्वामी म्हणाले,''बाई, हे द्रव्य यांचे हाती द्यावे. त्यांचे हाताने आम्ही स्वीकारू.''

धानाईसा, एक-एक द्रव्य निलभट्टाचे हाती देत. निलभट्ट स्वामींची त्या द्रव्याने पूजा करीत. अशी अनेक रत्नांनी स्वामींची पूजा धानाईसाने केली. निलभट्टाचे हाती द्रव्ये देऊन स्वामींनी पूजा करून घेतली. त्यामुळे ती एका अर्थाने निलभट्टाचीच पूजा ठरली.

पूजेतील सर्व मौलिक रत्ने श्रीचक्रधर स्वामींनी प्रसाद म्हणून परत धानाईसाचे पदरी घातली. तेव्हा ती म्हणाली, आम्ही तुम्हांस रत्ने वाहिली. आता ती परत कशी घेणार?'' स्वामी म्हणाले, '' तुम्ही यांना दिले. यांनी आम्हास वाहिले, आता आम्ही तुम्हांस प्रसादवत परत करीत आहोत. याने तुमच्या भांडारात वृद्धी होईल.''

भांडारेकारांच्या खांद्यावर हात ठेवून स्वामी धानाईसाचे आवारातून बाहेर पडले. ते म्हणाले,''भट्टो ! आम्ही तुमचे मनोरथ चरितार्थ केले !'' तुमचे मनातली इच्छा पूर्ण केली.

## लोकीचा श्रेष्टू तो येथीचा नष्टु

स्वामींसह भांडारेकार अचलपूरहून नांदेडला गेले. तेथे नृसिंहाचे मंदिरात थांबले. निलभट्ट भिक्षा करीत आणि आधी भिक्षान्नाचे स्वामींना भोजन वाढीत. त्यानंतर उरलेल्या अन्नाचा ते प्रसाद करीत. हे नित्याप्रमाणे येथेही होत होते. एके दिवशी एका गावात भांडारेकार भिक्षेसाठी गेले. तेथे एका पाठशाळेत मुले शिकत होती. पाठशाळेची इमारत शिकस्त होती. भांडारेकारांना जाणवले की पाठशाळेची इमारत कोसळते आहे. त्यांनी मुलांना ताबडतोब बाहेर यायला सांगितले. इमारत पडते आहे. बाहेर निघा असा भांडारेकारांनी ओरडा केला. मुले भराभर बाहेर आली. त्यानंतर क्षणार्धात इमारत कोसळली. भांडारेकारांनी सांगितले नसते तर

सर्व मुले इमारतीखाली दबली असती. मुले सुखरूप घरी गेली. ती घरोघर सांगत होती की, एका महात्म्याने आम्हांला वाचविले. लोक या मुलांना वाचविणाऱ्या महात्म्याला पाहायला गोळा झाले.

भांडारेकाराचे घरोघर स्वागत होत होते.'पाट' टाकून, गंधाक्षता लावून, भिक्षा वाढण्यात येऊ लागली. भिक्षा घेऊन ते परत आले. तेव्हा स्वामींनी त्यांना क्षेमवार्ता विचारली. तेव्हा त्यांनी ते सर्व सांगितले. लोकांनी आज 'पाट पिढे टाकून बरवी पूजा करून भिक्षा वाढली म्हणूनही सांगितले, तेव्हा स्वामी म्हणतात,"असे करू नका !" यामुळे लोक तुमची पूजा जरूर करतील परंतु मग तुम्ही आम्हांस मुकाल ! लोकप्रियता किंवा आमची प्रियता यापैकी एकाची निवड करा !" भांडारेकारांनी स्वामींची निवड केली. मुलांना वाचविण्याच्या श्रेयाचे धनी होऊन लोकांकडून पूजा पुरस्कार स्वीकारू नका. अशी सकाम लोकसेवा करू नका असा पाठच यावेळी स्वामींनी भांडारेकारांना दिला.

## निलभट्टाचे देहावसान

स्वामींच्या सान्निध्यात १६ वर्षे राहिलेला हा भक्त आता थकला होता. त्यांना शौचाचा त्रास होऊ लागला होता. त्यांना वारंवार शौचाला जावे लागत असे.स्वामी त्यांना हाताचा आधार देऊन बाहेर न्यायचे. त्यांचे कपडे धुवायचे व शरीर स्वच्छ करायचे. मंदिरातल्या बडव्यांना आणि ब्राह्मणांना त्या बिमारीचा त्रास जाणवू लागल्याचे जाणवत होते. त्यामुळे स्वामींनी भांडारेकारांना गंगेपलीकडे नंदेश्वराचे मंदिरात नेले. तेथे तीन रात्री त्यांची शुश्रूषा केली. शेवटी त्रास वाढला. त्यांचा अंतसमय आला होता. स्वामींनी त्यांना मांडी दिली. तेव्हा स्वामी म्हणाले,"भट्टो ! कालवंचना करू !" तुमचे आयुष्य वाढवू कां ?"

यावर तो थोर भक्त म्हणाला,"नको प्रभू ! आता तुमची मांडी मला आधाराला मिळाली आहे. जे काय मिळायचे ते याच वेळी हवे. पुढे वाचून काय करू !" होवावे काई ते आताची होवावे जी." स्वामींच्या मांडीवर त्यांनी शेवटचा श्वास सोडला. सोळा वर्षे सोबत राहिलेला हा भक्त आज सोडून गेला होता. स्वामींनी त्याचा आपल्या हाताने निक्षेप केला. त्याला सद्‌गती दिली.

## दोघेही विजयी केले

भांडारेकारांच्या मृत्यूनंतर स्वामी पुन्हा एकाकी फिरू लागले. एका गावी दोन साधू वादविवाद करीत होते. तेथे स्वामी पोहोचले. एका साधूने दुसऱ्यास

प्रश्न विचारला. प्रश्न अवघड होता. त्या साधूस उत्तर येत नव्हते. तेव्हा स्वामी त्या साधूस म्हणाले, ''बोला. या प्रश्नाचे उत्तर तुम्हास येते. बोला !'' काय आश्चर्य ! तो निरुत्तर झालेला साधू बोलू लागायचा व त्या उत्तराने सर्वांचे समाधान व्हायचे. त्यानंतर दुसऱ्याला प्रश्न विचारायचा ! तोही प्रश्न अवघडच असायचा. साधूला उत्तर सुचेना. तोही निरुत्तर होत असे. तेव्हा स्वामी त्यालाही म्हणायचे, ''तुम्हालाही याचे उत्तर येते, बोला तुम्हास उत्तर येते,बोला ! बोला !'' आश्चर्य घडले, त्यानेही समाधानकारक उत्तर दिले. पुन्हा असा क्रम बराच वेळ सुरू राहिला. हा बौध्दिक खेळ बराच वेळ करून शेवटी स्वामी म्हणाले, ''तुम्हा उभया जयो.'' हा उभयपक्षी जय मिळवून देण्याचा प्रकार नवीनच होता. ही आगळी बौद्धिक प्रेरणा देण्याची स्वामींची महान शक्ती होती. हा एक वेगळाच चमत्कार होता. तो पाहून स्वामींची महानता उपस्थितांचे लक्षात आली आणि त्या उभय साधूंनी आणि सर्व उपस्थितांनी स्वामींना साष्टांग दंडवत घातले.

## सन्मान आणि अवमान दोन्हीत समदृष्टी

राहेर या गावातून पाणिपात्र भिक्षा करून स्वामी गंगेकडे भोजन करायला निघाले होते. समोरून एक शासकीय अधिकारी येत होता. त्याचे समोर राऊत-पाईक होते. त्यातल्या एका राऊताने आपल्या भाल्याने स्वामींना लोटले. त्या धक्क्याने स्वामींचे हातातील भिक्षान्न खाली पडले. स्वामी भिक्षान्नाची शिते वेचण्यासाठी खाली बसलेत. तेवढ्यात तेथे तो शासकीय अधिकारी पोहचला. तो आपल्या समोर एक तेजस्वी संन्यासी खाली पडलेली भिक्षान्नाची शिते वेचीत असल्याचे पाहून थांबला. पालखीतून खाली उतरला. आपल्या राऊत पाईकावर रागविला. म्हणाला,-

'' हे काय रे केले दुष्टांनो? या थोर गोसाव्यांना त्रास दिलास?''

स्वामीकडे वळून दोन्ही हात जोडून तो म्हणाला,

''महाराज, या आपण माझ्यासोबत माझे बिढारावर! तेथे आपण भोजन करू!''

स्वामींनी या अधिकाऱ्याची विनंती सविनय नाकारली आणि आपली शिते वेचणे सुरूच ठेविले.स्वामींचा निश्चयी नकार पाहून अधिकारी दुःखी झाला. तो स्वतः खाली बसून स्वामींसोबत शिते वेचू लागला.

त्यांच्या पाईक-राऊतांनी केलेला अवमान स्वामींनी दुर्लक्षिला होता. तसाच

अधिकाऱ्यांनी देऊ केलेला सहभोजनाचा सन्मानही सविनय नाकारून दुर्लक्षित होता. ही मान-अवमानाकडे पाहण्याची स्वामींची समदृष्टी होती. स्वामींचे दर्शनाने शासकीय अधिकारी भारावून गेला होता. त्याने स्वामींना साष्टांग दंडवत केले.

## विष्णु भट्टाची सिद्धी

एक विष्णु भट नावाचे दांभिक साधू होते. ते लोकांना आश्चर्य वाटेल असे काही चमत्कार दाखवित असत. ते रात्री अंधारात काही घरांचे दाराचे फटीतून पाहत. आतले सर्व पाहून दुसरे दिवशी त्या घरी जात. त्यांना सांगत की काल रात्री तुम्ही अमुक पदार्थ जेविले. अशा-अशा गोष्टी केल्यात. लोकांना आश्चर्य वाटायचे. त्यामुळे त्यांना ईश्वर पुरूष समजून लोक त्यांचे भजनी लागले होते.

एकदा त्यांनी तोंडात एक घुटिका धरून आकाशातून चालण्याचा प्रयोग केला. ते आकाश मार्गाने जात आहेत म्हणून लोक प्रभावित झाले होते. विष्णु स्वामी आकाशातून देवलोकात जात आहेत. म्हणून लोक त्यांना नमस्कार करू लागले. इतक्यात वावटळ आली. त्यासरशी नाकात गेलेल्या धुळी कणामुळे विष्णु स्वामींना जोराची शिंक आली. त्यामुळे त्यांचे तोंडातली घुटिका खाली पडली. त्याबरोबर हे विष्णु स्वामीही खाली कोसळले. बरे झाले की ते नदीच्या पाण्यात पडले अन्यथा त्यांचे हात-पाय वा हाडे मोडली असती.

ही त्यांची फजिती होऊनही लोक त्यांच्या चमत्काराने इतके प्रभावित होते की ते त्यांची ईश्वर पुरूष समजूनच पूजा करीत असत. ही गोष्ट स्वामींनी आपल्या शिष्यांना सांगितली होती.ती समाजातील दांभिकाची भोंदुगिरी उघड करण्यासाठी सांगितली होती. त्या काळच्या सिद्धीच्या चमत्काराचे हे विडंबन होते. असे अनेक साधू अंधश्रद्ध धर्मभोळ्या जनतेचे शोषण करीत होते हे स्वामींनी पाहिले होते. असेच काही साधू स्वामींना सतत दिसत असत. त्यांच्या भोळ्या भाविकांच्या शोषणाचे डंख स्वामींना अस्वस्थ करीत असत.

## घोडाचुडीचे शिष्यांचा क्रूरक्रोध

स्वामी रस्त्यात एका झाडाखाली बसले होते. तेथे काही सिद्ध-साधकही आले. ते घोडाचुडी नावाच्या सिद्धाचे शिष्य होते. किष्किंध पर्वतावर गुरूच्या भेटीला निघाले होते. स्वामीचे तेजस्वी रूप अन् आत्यंतिक वैराग्य पाहून ते त्यांच्याकडे आकर्षित झाले होते. ते पुढच्या प्रवासासाठी निघतांना स्वामींना म्हणाले, ''देवहो! याल आमच्या सोबत किष्किंध पर्वतावर? आम्हांला तुमची व

तुम्हाला आमची सोबत होईल!'' स्वामींनी मान्य केले. स्वामी त्यांचे सहप्रवासी झाले. परंतु लवकरच स्वामींचे असे लक्षात आले की ते सिद्ध आपल्या सिद्धीच्या धाकाने लोकांना धमकावित असत. लोक सिद्धीच्या प्रभावाने त्यांची पूजा करीत असत. भजत असत. त्या भजनात अन् पूजनात भक्तिभाव कमी व धाकच जास्त असायचा.

असेच एका गावात हे सिद्ध भिक्षा मागायला गेले. एका दारात आवाज दिला, ''भिक्षां देहि.'' हा आवाज ऐकताच घरातली बाई घाबरली. भिक्षा देण्यास उशीर झाला तर साधूचा कोप होईल म्हणून तिने घाई-घाईत चुलीवर शिजणारी कढत-कढत आंबील लाकडी पळीत घेतली अन् 'करतल भिक्षा' घेणाऱ्या साधूच्या हातावर टाकली. आंबील कढत होती. उष्ण होती. साधूचे हात पोळले. साधु संतापला. रागाच्या भरात त्याने त्या घरास आगच लावून दिली. झोपड्या अन् लाकडाची घरे होती. एका घराची आग गावभर पसरायला वेळ लागला नाही. सारे गावच पेटले होते. साधु गावाबाहेर आपल्या बिढारावर परतले. अन् ही त्यांची 'शौर्यकथा' स्वामींना सांगू लागले.

हे गाव जाळणाऱ्या तामसी साधूंच्या क्रोधाग्नीने स्वामींचे कोमल-कोवळे हृदय पोळले होते. त्या पोळलेल्या हृदयातून आवाज आला की आता या तामसांचा तांडा सोडून गेलेच पाहिजे. पेटते गाव पाहून स्वामींचे हृदयच भाजले होते. मन जळत होते. त्या अवस्थेत स्वामी तेथून निघाले. ते तीन अहोरात्र चालत होते. खाण्या-पिण्याचे भान त्यांना उरले नव्हते. ते एके दिवशी भल्या पहाटे सरळ गुरुगृही, श्री प्रभूंच्या दर्शनार्थ रिध्दपूरास पोहोचले. दोन्ही देवांच्या प्रेमभराने भेटी झाल्या. या भेटीने श्रीचक्रधर स्वामींच्या हृदयातला ग्रामदहनाचा दाह शांत झाला होता.

### तू चक्रधरू होय म्हणे-देव होय म्हणे

स्वामींनी समाजाचे धार्मिक शोषण पाहिले होते. विष्णुस्वामींची घुटिका आणि घोडचुडीच्या शिष्यांचे तामसी प्रताप पाहून धर्मविकृतीच्या दावाग्नीत समाज कसा होरपळून जळतो आहे याचे चांगले दर्शन त्यांना घडले होते. त्यांच्या अंतर्मनात या विकृतीच्या विरूद्ध विद्रोह करण्याचा विचार सुप्त ज्वालामुखीसारखा खदखदत होता. तो आता वर येऊ पाहत होता.

ही श्रीचक्रधर स्वामींची आंतरिक तगमग श्रीप्रभू महाराजांनी जाणली होती.

त्यामुळेच त्यांनी स्पष्टपणे सूचित केले की-

"बाबारे तू अवतारी पुरूष आहेस."

"तू प्रत्यक्ष परमेश्वराचा उभयदृश्यावतार आहेस."

हे सूचित करणारी लीळा अशी घडली.

दोघांची भेट झाली तेव्हा स्वामींच्या उजव्या बाजूस श्री गोविंद प्रभु महारा बसलेले होते. दोघांच्याही मधे एक उभी पाषाण मूर्ती होती. त्या पाषाण मूर्ती मुकुटावर हात ठेवून श्री प्रभु म्हणाले,-

*"हे शिर होय म्हणे परंतु देव नाही."*
*मूर्तीचे कपाळावर हात ठेवून म्हणाले,*
*"हे कपाळ होय म्हणे परंतु देव नाही."*
*हे तोंड आहे परंतु देव नाही."*
*"हे हात आहे पण देव नाही."*
*हे पाय आहे पण देव नव्हे."*

असे प्रत्येक अवयवावर हात ठेवून श्री प्रभु म्हणत होते. त्यानतंर श्रीचक्र स्वामींचे डोक्यावर हात ठेऊन ते म्हणाले,

*"हे शिर आहे अन् देवही आहे".*
*हे कपाळ आहे अन् देवही आहे.*
*हे डोळे आहे अन् देवही आहे.*
*हे हात आहेत अन् देवही आहे.*
*हे पाय आहत अन् देवही आहे.*

हा देव होय म्हणे : देवची होय म्हणे : चक्रधर होय म्हणे.

चक्रया होय म्हणे : चक्रधरू होय म्हणे : होय म्हणे : होयची म्हणे : " त्या विदेही दैवी महापुरुषाची वाणी श्रीचक्रधर स्वामींच्या देवत्वाची साक्ष हो स्वामींना धर्मविकृती अन् सामाजिक विकृतीच्या विरुद्ध जनजागरण कर जीवोद्धरणाचे कार्य करण्याची जणु ही आज्ञाच होती. त्यात आशीर्वादही हो

ही आज्ञा अन् आशीर्वाद घेऊन श्री चक्रधर स्वामी आपल्या कार्या शुभारंभ करण्यासाठी स्थान आणि मुहूर्ताचे शोधात पूर्वेकडून पश्चिमेकडे निघा जणु हा पूर्वेचा ज्ञानसूर्य पश्चिमेच्या अंधारविश्वास उजेडी–उजेड करण्यास वाट चालू लागला होता. या वाटेत किती काटे आहेत? किती खाच ख

आहेत. किती संकटे आहेत? किती मर्यादांच्या भिंती आहेत? याचा किंचितही विचार न करता हा जीवोद्धरणासाठी प्रबोधाची दीपशिखा घेऊन पैठणच्या दिशेने निघाला होता.

### धर्मप्रवर्तनाचे वाटेवर

श्री प्रभूंच्या आज्ञेने श्रीचक्रधर स्वामींनी धर्मध्वजा खांद्यावर घेऊन महाराष्ट्राच्या धर्मक्षेत्राच्या दिशेने प्रवास सुरू केला होता. दक्षिण भारतात पैठण ही 'वाराणशी' मानल्या जात होती. ते धामिक केंद्र होते. तेथे जाऊनच आपल्या नूतन धर्माचे प्रवर्तन करण्याचा स्वामींचा हेतू होता. हा निर्धार श्री प्रभूच्या प्रेरक संदेशातून स्फुरलेला होता. हाच श्री प्रभूंकडून त्यांना मिळालेला उपदेश होता.

स्वामी पैठणला जाता-जाता मेहकरला थांबले. सायंकाळची वेळ होती. स्वामी बाणेश्वराचे मंदिराचे पश्चिमेकडील दाराच्या डाव्या सोंडेवर जाऊन विसावले. कटिप्रदेशाला एक पांढरे वस्त्र टोंगळ्यापर्यंत गुंडाळलेले होते. डोक्याला एक वस्त्र गुंडाळलेले होते. सर्वांग उघडेच होते. सुडौल रेखीव शरीर आणि सुंदर डोळ्यातून दैवी तेज चमकत होते. गोरेपान शरीर सतत सूर्याच्या कडक उन्हात उघडे असूनही त्यावर काळी झाक आल्याचे दिसत नव्हते. असा हा राजबिंडा तरुण पुरुष पाहून मंदिरातून बाहेर आलेली बोणेबाई क्षणभर स्तंभितच झाली. ती म्हणाली,

" बाबा! कोणाच्या कुसीसी होतासी?

बाबा! कोणाची कुसी उसासिली जी?

बाबा! कोण पापिनी तुम्हास जन्म देऊन असे उघड्यावर सोडून गेली?"

या प्रश्नाचे उत्तर द्यायला स्वामींनी आपले ओठ हलविले नाहीत. त्यावर ती बाई म्हणाली,

" आपण काय मौन्यदेव आहांत? आम्ही आपल्याला मौन्यदेव याच नावाने संबोधायचे काय?"स्वामींनी केवळ होकारार्थी मान हलविली. बोणेबाई त्यांना मौन्यदेव याच नावाने संबोधू लागली. स्वामींना तिने आग्रहपूर्वक आपलेकडे ठेवून घेतले. स्वामी बाणेश्वराचे मंदिरात झोपायचे व त्याच आवारातील बोणेबाईकडे जेवणासाठी जायचे.

### श्रीकृष्ण काय मातीचा?

तेवढ्यात गोकुळ अष्टमीचा सण आला होता. मातीचे गोकुळ तयार करण्यासाठी बोणेबाईने माती आणली होती. ती पाहून स्वामी म्हणालेत, "बाई ही

माती कशासाठी?''

''बा! मौन्यदेवहो, आज गोकुळ अष्टमी! या दिवशी श्रीकृष्ण गोपाळ, गोपी आणि गोकुळ तयार करून त्याची पूजा करायची असते. त्यासाठी ही माती आणली आहे!'' त्यावर स्वामी हसून म्हणाले,''बाई! श्रीकृष्ण काय मातीचा? गोप-गोपी काय मातीच्या? आम्ही श्रीकृष्ण होऊ तुम्ही देवकीदेवी व्हावे. ही माती बाहेर फेका!''

धर्म-कल्पने भोवती चिटकविण्यात आलेली भोळसट रूढींची बंधने स्वामींना तोडावयाची होती. त्याची ही सुरुवातच होती. धर्मभोळ्या जनांनी धर्माची मूळ कल्पना बदलवून टाकणाऱ्या उपचारांनाच धर्म समजून त्याचे आचरण सुरू केले होते. देवापेक्षा मूर्तीला आणि मूर्तीपेक्षा पुजाऱ्यालाच अधिक माहात्म्य प्राप्त झाले होते. स्वामींना या 'उपचारांचे', वा रूढींच्या मळाने मलीन झालेल्या धर्माचे खरे स्वरूप लोकांना दाखवावयाचे होते. त्याचा प्रारंभच स्वामींनी मेहेकर येथे केला हेता.

### उपवास कशासाठी?

गोकुळ अष्टमीचे दिवशी बोणेबाई उपवासाचे व्रत करीत असत. त्या व्रताचा त्यांनी त्याग करावा म्हणून स्वामी म्हणाले,

''बाई! श्रीकृष्णाचा जन्म झाला तेव्हा देवकीदेवीने उपवास केला होता काय? एवढीशी पेज तर त्या मातेने खाल्लीच असेल ना? देवकीदेवीला महान पुत्ररत्न प्राप्त झाल्याचे आनंदाप्रीत्यर्थ क्लेश कशाला?

या युक्तिवादाने बोणेबाई निरुत्तर झाली आणि तिने स्वामी सोबत जेवण घेतले.

### इवलासा त्र्यंबकु इथेच आणा.

नासिकला सिंहस्थ पर्वानिमित्त मोठा कुंभमेळा होणार होता. त्यानिमित्त मेहेकरची बरीच मंडळी जाणार होती. त्यांचेसह बोणेबाई सुद्धा जाणार होत्या. बोणेबाई यात्रेला निघाल्या त्यांचे सोबत बोणेबाईच्या आग्रहावरून श्री मौन्यदेवही निघाले. हा यात्रिकांचा पोहा पैठण क्षेत्री पोहचला.

बोणेबाई तीर्थ करायला पैठण नगरात फिरत होत्या. बोणेबाईना रस्त्यात नागुबाईसा भेटल्या. नागुबाईसाही एक तपस्विनी होती. तिचा एक स्वतंत्र संप्रदाय होता. ती महंत होती. तिला बोणेबाईने सांगितले की आमच्या सोबत एक महान

पुरुष आहेत. ते दिव्य तेजाने युक्त आहेत. अशी प्रशंसा केली. तेव्हा स्वामी पैठण नगरात नगरदर्शनासाठी फिरत होते. समोरून नागुबाई येत होती. हे दिव्य तेज पाहून त्या साध्वीचे कुतूहल जागे झाले. तिने विचारले,-

"आताच मला बोणेबाईनी सांगितले होते की त्यांचेसह एक दिव्य तरुण सत्पुरुष आले आहेत. तेच का आपण? आपण मेहेकरवरून आलेले आहात ना?"

स्वामींनी मान हलवून होकार दिला.

आपण मौन्यदेव का?

स्वामींनी पुन्हा मान हलविली.

"आपण आमचे घरी चलावे!" स्वामींनी या साध्वीचे आग्रहाचे निमंत्रण नेहमीसारखी मान हलवून स्वीकारले. स्वामी बाईच्या मागे चालू लागले. बाईच्या कुटीत स्वामींना बसायला पायपुसणे टाकण्यात आले. जेवायला पाणीभात वाढला. भोजनोत्तर नागुबाईनी चर्चा सुरू केली. नागुबाई या एका तपस्विनी संप्रदायाच्या मान्यवर महंत असल्यामुळे त्यांच्या बऱ्याच शिष्याही होत्या. ती धर्मगुरूसारखी वागत असे. तिला आपल्या पदाचा गर्व होता. म्हणूनच तिने स्वतः उच्च आसनावर बसून स्वामींना पायपुसणे बसायला टाकविले होते.

चर्चेला सुरुवात करताना नागुबाईसा म्हणाल्या की "तुम्ही नासिकला कुंभमेळ्यात जाणार आहात ना? त्र्यंबकाचे दर्शनासाठी जाणार आहात ना? आपण महात्मे! आपणास कसचा आला आहे त्र्यंबक? कसला कुंभमेळा? हे पैठण महानगर आहे. दक्षिणेतली काशी आहे. थोर धर्मक्षेत्र आहे. अनेक संप्रदायाचे संत-महंत येथे राहतात. पिंपळेश्वरासारखी असंख्य तीर्थस्थाने येथे आहेत. आपण येथेच थांबायला हवे. अनेक विद्वान या नगरात राहतात. आपणही राहावे. भोग नारायणी निद्रा करावी. आपणास त्र्यंबकाची काय गरज? आपण असाल तेच तीर्थ होईल." स्वामींना हेच हवे होते. ते रात्री भोग नारायणाच्या मंदिरात राहिले. परंतु बोणेबाई आपल्या बिढारावर स्वामींची वाट पाहत रात्री बराच वेळ जागत होत्या.

सकाळी भोगनारायणाच्या मंदिरातून स्वामी पुन्हा नागुबाईसांच्या कुटीत गेले. पुन्हा तेच पायपुसणे स्वामींना आसन म्हणून बसायला टाकले. तेवढ्यात स्वामींना पाहत बोणेबाई आल्या आणि म्हणाल्या, "चला मौन्यदेवहो! सोबतचे लोक निघाले!" स्वामी उठले. तेव्हा नागुबाईसानी पुन्हा निमंत्रण देत म्हटले,

"पुढे या नगरात याल तर आमचे घरी या!" स्वामींनी स्मित हास्य करून निमंत्रण स्वीकारले आणि स्वामी उठून बाहेर पडले. लोणार तीर्थावरून गोदावरी ओलांडून जायचे होते. तेथे सर्व यात्रिकांनी पायातले चप्पल-जोडे काढले. नदी उतरू लागले. स्वामी तेथे बोणेबाईंना म्हणाले, " बाई आता आम्ही येथेच थांबू. तुम्ही इवलासा त्र्यंबक आमचेसाठी येथेच घेऊन या."

बोणेबाईना निरोप देऊन स्वामी पैठण नगरात परतले.

## नागुबाईसांचे मतपरिवर्तन

नागुबाईसा ही पयोव्रती महंत होती. तिच्या बऱ्याच स्त्री-शिष्या होत्या. तिला आपल्या महंतपणाचा अहंकार होता. त्या अहंकाराची जपवणूक करणारे पूजा विधी करायला त्यांच्याकडे हंसाबाई नावाची एक शिष्या होती. मानमान्यतेच्या हव्यासापोटी ही अहंकारी बाई आपल्या शिष्यांचेकडून सदैव पूजा करवून घेत असे. सजविलेल्या उच्चासनावर बसत असे आणि आपल्या शिष्यांच्या कडून आपले सेवादास्य करवून घेत असे. कुणी अभ्यागत घरी आले तर त्यांना बसायला पायपुसणे टाकायला लावायची आणि आपण मात्र आरती ओवाळून घ्यायची. हा तिचा ठरलेला विधी होता.

श्री चक्रधरस्वामी बोणेबाईना त्र्यंबकेश्वरला जाण्यासाठी नदीपर्यंत बोलवायला गेले होते. "तेथून इवलासा त्र्यंबक आमचेसाठी आणा." असा विनोदगर्भ शब्दात बोणेबाईंना निरोप देऊन स्वामी पैठण नगरात परतले होते. रात्रौ भोगनारायणाच्या मंदिरात विश्रांतीसाठी थांबले व सकाळी नागुबाईसांचे कुटीत गेले.

हंसाबाईने स्वामींना बसायला परत तेच पायपुसणे टाकले. नागुबाईसांना बसण्यासाठी उच्चासन रचले. त्यावर नागुबाईसांना बसवून त्यांची पूजा सुरू झाली. पंचारती ओवाळून झाली. आज बाईसांचे मुखमंडलावर महंतकीची अहंता अभिमान चमकत होती. आजची पूजा नागुबाईसा आणि हंसाबाईचे दृष्टीने विशेष महत्त्वाची होती. या पूजेच्या निमित्ताने नवागत महात्म्यास प्रभावित करण्याचा त्यांचा हेतू होता, हे स्पष्ट होत होते.

श्रीचक्रधरस्वामी बाईसांच्या पूजेचे कौतुक पाहत पायपुसण्यावर निवांत बसले होते. बाईसा या पूजाप्रकाराने स्वामी किती प्रभावित होतात, हे पाहण्याच्या हेतूने स्वामींकडे पाहू लागली. स्वामींच्या तेजःपुंज डोळ्यात तिने पाहिले खरे परंतु त्यामुळे तिला वेगळाच अनुभव आला. स्वामींच्या डोळ्यातून तिच्या दिशेने

असंख्य तेजाळ किरणे येत आहेत, असे तिने पाहिले व काही समजण्याआधीच ती एका आगळ्या वेगळ्या भावावस्थेत शिरली. या भावावस्थेत ती निमग्न झाली तेव्हा तिला एका दिव्य आनंदाचा अनुभव आला. ही भावावस्था तिने यापूर्वी कधीच अनुभवली नव्हती. या अवस्थेची आठवण तिला तिच्या पुढच्या आयुष्यभर राहिली. तो अवर्णनीय आनंद तिला पुढे कधी शब्दात सांगता आला नाही. असा हा अनिर्वचनीय आनंद तिने भोगला होता. त्यावेळी त्या आनंदावस्थेतून कधीही बाहेर येऊ नये असेही तिला वाटले. परंतु त्या अवस्थेला मर्यादा होती. तो आनंद बराच काळ अनुभवल्यानंतर ती पुनश्च पूर्वावस्थेत आली. तेव्हा तिचा अहंकार, तिचा दंभ, तिच्या गुरूगिराचा सोस आणि मानमान्यतेची अभिलाषा पार निमाली होती.तिच्या मनाची दंभावस्था पार गळून पडलेल्या पिंपळपानासारखी झाली होती.

तिने स्वामींकडे पाहिले आणि त्यांच्या ईश्वरावताराचा तिला साक्षात्कार झाला. तिला आपल्या पूर्वीच्या वागण्याची खंत वाटली. ती लगबगीने आसनावरून उठली. अन् स्वामींच्या पायावर साष्टांग दंडवत घालून लोळू लागली. अनुतापपूर्वक ती स्वामीची करुणा भाकीत होती. क्षमायाचनेचे शब्द तिच्या अनुतापदग्ध अश्रूंत भिजलेले होते. स्वामींना तिने पायपुसण्याहून उठविले. आणि आपल्या उच्चासनापेक्षा अधिक उच्च आसन रचून त्यावर उत्तमोत्तम वस्त्रे टाकली. स्वामींना त्या सुशोभित आसनावर बसविले. त्यांचे पाय धुऊन पाद्य पूजा केली. त्यांची मनोभावे पुष्प पूजा केली. आरती अं ओवाळली. आणि दोन्ही हात जोडून ती उभी राहिली. अनुतापदग्ध अंतःकरणाने प्रायश्चित्ताचे शब्द तिच्या कंपायमान ओठातून थरथरत बाहेर पडले. ती म्हणाली,-

"स्वामी जगन्नाथ! आपणांस पायपुसण्यावर बसवून मी पापिणी उच्चासनावर बसले. पूजा-आरती करून घेतली. मला माझ्या या घोर पातकाबद्दल क्षमा करा, स्वामी जगन्नाथा!"

या शब्दांची पुन्हा-पुन्हा आवृत्ती करीत तिचे डोळ्यातून अनुतापादग्ध अश्रूंची धारच लागली होती. हा अखंड अनुताप पाहून स्वामींचे कृपाळू, कनवाळू, दयाळू अंतःकरण द्रवले नसते तरच नवल. ते आपल्या दयार्द्र स्वरात म्हणाले,

"बाई! आता अनुताप पुरे करा. उठा आणि कामाला लागा.तुम्ही आता आमच्या धर्मकार्यात सहभागी व्हा. अवघे जनलोक अज्ञानाच्या गर्तेत पडलेले

आहेत. तुमचा सहयोग आता विद्यादानासाठी, ज्ञानदानासाठी झाला पाहिजे. ते कार्य आता आपण करू या, चला उठा.''

स्वामींचा हा जीवांच्या उद्धाराचा विचार बाईसांना पटला आणि आता मी तुमचे मार्गाचे पूर्ण अनुसरण करीन. आपण दाखवाल त्या मार्गाने जाईन. असा संकल्प करून बाईसांनी स्वामींच्या मार्गाचे अनुसरण करण्याचा दृढ संकल्प व्यक्त केला.

हा सर्व अघटित प्रकार पाहून हंसांबा मात्र चकितच झाली. तिला हे सर्व विचित्र अन् विपरीतच वाटले होते. बाईसा तिची गुरू होती. पयोव्रतीयांची थोर महंत होती. त्यामुळे आपल्या महंत बाईने एका महात्म्याची पूजा करावी हे विचित्रच नव्हते तर ती पयोव्रतीयांच्या धर्माची थोर अवेहलना होती असे हंसाबांना वाटले.

हंसाबाई वामदेवाकडे गेली. त्यांना हे विपरीत कसे घडले ते सांगितले. ती म्हणाली, '' आमचा पयोव्रतीयांचा मार्ग या नागुबाईने नासविला. कोण जाणे कोण महात्मा या बाईने गुंफेत घेतला. त्याची सेवा करते. त्याचे उच्छिष्ट प्रसाद घेते. त्याचे पाय धुऊन तीर्थ घेते. त्याची आरती करते. अशीच बदनामी करीत ती हंसाबाई पांडेयाकडेही गेली. हेच गावभर सांगत सुटली. बाईसाकडे पूर्वी ती सर्व कामे करायची. आता तिने कामाला हात लावणे सोडले होते. श्री चक्रधरांना बाईसांनी हे सर्व सांगितले.

**हंसाबाईचे परिवर्तन**

सकाळी श्री चक्रधर स्वामी भोगनारायणाचे मंदिरातून कुटीत येऊन ओट्यावर बसले होते. इतक्यांत हंसाबाई आत शिरली.

स्वामींनी तिच्याकडे पाहून म्हटले, ''या हंसराजा या!''या शब्दांनी हंसांबात तात्काळ परिवर्तन झाले. तिची बाईसासारखीच अवस्था झाली. क्षणभर ती भावावस्थेत गेली. स्वामींचे शब्दात एक आगळे सामर्थ्य होते. एक प्रकारचे वेधक आकर्षण होते. हंसाबाईची भावावस्था बराच वेळ राहिली. जेव्हा ती पूर्वावस्थेत आली, तेव्हा तिने स्वामींचे पायावर लोटांगण घातले. तीही स्वामींना अनुसरली अन् बाईसाचे कुटीत पूर्वीसारखी कामे करू लागली.

एके दिवशी हंसाबाई सांगू लागली, की तो पांड्या स्वामीबद्दल गावभर काही काही बकत असतो. तो म्हणतो की, ''या बायांनी आपला पयोव्रतीयांचा

धर्म बुडविला.'' पांड्याची ही बकबक बाईसानांही कळली होती.

**पांडेयास स्वप्न दृष्टांत**

खरेच पांडे हा गावभर फिरून स्वामीबद्दल अफवा पसरवू लागला होता. बाईसा या पयोव्रतीयांच्या महंत होत्या. तोही त्याच पंथाचा होता. तो पंथ सर्वश्रेष्ठ धर्मपंथ आहे, असे त्याचे मत होते. तो धर्म बाईसाने बुडविला. ती एका महात्म्याच्या मागे लागली. त्याची पूजा करून त्याचे पायाचे तीर्थ घेते. त्यांचे उच्छिष्ट प्रसाद घेते. असा त्याचा रोष होता. हंसाबाईसारखाच तो भक्त होता. हंसाबाईचे मतपरिवर्तन झाले होते. परंतु पांडे मात्र गावभर तसेच बोलत होता.

एके रात्री पांडे आपले कुटीत झोपला असताना त्याला एक स्वप्न दिसले. त्या स्वप्नात त्याला मारायला मुद्गल घेऊन यमदूत आले होते. ते त्याचे अंगावर धावून येत. मुद्गलाने मारायला पुढे आले. ते मुद्गल मारणार इतक्यात श्रीचक्रधर आडवे येऊन त्यांचे मुद्गल वरच्या वर धरून ठेवू लागले, असे अनेकदा ते यमदूत मारायला येत व स्वामी आड येऊन पांड्यास वाचवीत. श्रीचक्रधर स्वामी हे प्रत्यक्ष द्वारावतीकार चांगदेव राऊळ आहेत, असे त्याला वाटले. त्याला जाग आली तेव्हा तो दुःख करू लागला की आपण साक्षात द्वारावतीकार श्री चांगदेव राऊळांनाच दूषणे देत गावभर फिरत होतो. तरीही ते आपल्याला यमदूतापासून वाचविण्याकरिता आड आले. सकाळ होताच आपण त्यांची, बाईसांची आणि हंसाबाईची क्षमा मागू, असे त्यांनी ठरविले. तो सकाळ होण्याची वाट पाहू लागला.

सकाळी स्वामी नेहमीसारखे भोगनारायणाचे मंदिरातून बाईसांचे कुटीत गेले. त्यांना तिथे जाताना पाहून त्याचे मागोमाग पांडेही आत शिरला. त्याने स्वामींचे दोन्ही पाय धरले. अनुतापपूर्वक क्षमायाचना करून म्हणाला, ''आपण मला यमदूतापासून वाचविले. आपण साक्षात द्वारावतीकार चांगदेव राऊळच आहात , असे मला स्वप्नात दिसले. आपण व्दारावतीकार चांगदेव राऊळ आहात ना? मला रात्री स्वप्नात तुम्हीच वाचविले. 'नागुबाई! हेच द्वारावतीचे चांगदेव राऊळ आहेत. यांनीच मला वाचविले. नाहीतर मी मेलो असतो.' असे म्हणून पांड्यांनी स्वामींना साष्टांग दंडवत केला. स्वामींनी मानेनेच होकार दर्शविला. त्या दिवसापासून स्वामींना पांडे, बाईसा आणि हंसांबा द्वारावतीकार चांगदेव राऊळ म्हणून संबोधू लागले. त्यापूर्वी बाईसांना बोणेबाईने सांगितलेले 'मौन्यदेव' हेच नाव माहिती

होते. आता त्यांचे नवे नामकरण झाले होते. आता त्यांना चांगदेव राऊळ या नव्या नावाने सर्वजण संबोधू लागले होते.

**वामदेवाची श्रद्धा बसली**

एके दिवशी स्वामी वामदेवाच्या मठात गेले. ही अकस्मात भेट होती. वामदेव संभ्रमात पडले. परंतु त्यांनी स्वामींचे 'येईजो जी' म्हणून स्वागत केले. ओट्यावर आसन रचून त्यावर स्वामींना बसविले. थोर सन्मान केला. हा सन्मान पाहून वामदेवाच्या शिष्यांना आश्चर्यच वाटले. वामदेव हे वाममार्गी महंत होते. त्यांच्या सिद्धीचा जनसामान्यावर भीतियुक्त प्रभाव होता. त्यात भीती फार अन् मान कमी असला तरी त्यांचे सामान्यजनांत मानाचे स्थान होते. ते कुणापुढे झुकत नसत. त्यांचे काळे रूप, उघडे-नागडे शरीर अन् वाममार्गी क्रियाकर्म लोकांच्या आदराचा आधार ठरणे शक्य नव्हते. परंतु जनतेवर आपल्या सामर्थ्याचा धाक जमविण्यात ते सक्षम ठरले होते.

त्यांनी स्वामींना मान दिल्याचे पाहून त्यांचे शिष्यांना आश्चर्य वाटणे स्वाभाविकच होते. स्वामी त्यांचे मठात वारंवार जाऊ लागले.

एके दिवशी स्वामीसह हे महात्मे बाहेर भोगावतीकडे गेले होते. वामदेव आणि स्वामी असे दोघेच होते. स्वामी पिंपळाचे झाडाच्या पूर्वेस उभे होते. वामदेव नेहमी म्हणायचे की,'' आम्हास भूतसृष्टी वश आहे. त्यांचेकडून आम्ही काहीही काम करून घेऊ शकतो. तो त्यांचा लटका अहंकार होता. स्वामींनी त्यांना विचारले,''वामदेव हो! आपणांस कोण 'वश' आहे.''वामदेव म्हणाले, जी : जी : भूतसृष्टी :'' स्वामी म्हणाले,''पाहूया! मला इथे दाखवा बरे!-

वामदेव भूतांना मंत्र उच्चारून आव्हानू लागले. बराच वेळ झाला. परंतु कुणीच येईनात. हे पाहून स्वामी म्हणाले,''तुम्हांला वश असून कुणीच कसे येत नाही?

जी : जी : एके कोल्हापूरा गेली : एके मातापूरा गेली :''- वामदेव.

स्वामी म्हणाले,'' आपणांस वश असूनही ती येत नाहीत. आता आम्ही बोलवितो. पाहा! दुपट्याचा पदर हवेत फिरवून स्वामींनी भूतसृष्टीस आवाहन करून बोलाविले. त्यांनी बोलविताच अनेक भूते, वेगवेगळ्या रूपात वामदेवास दिसू लागलीत. त्यांचे समोर नाचू लागलीत.''

हे पाहून वामदेवाचा अहंकार पार गळून पडला. परंतु त्यांचा 'अहं' मात्र

दुखावला गेला होता. आपण केवळ बतावणी करतो. ती खोटी बतावणी करून आपण सामान्य जनांना भुलथापा देतो. त्यांचेवर धाक जमवितो.परंतु हे तर प्रत्यक्ष करून दाखवू शकतात.यांचे अगाध सामर्थ्याचा प्रत्यय आला तर आपले शिष्यही यांचेकडेच वळलीत. आपल्याकडे कुणीच येणार नाही, अशी असूयाजन्य भीती त्यांचे मनात निर्माण झाली. तरीही स्वामींच्या सामर्थ्याचा प्रत्यक्ष प्रत्यय आल्यामुळे त्यांनी स्वामींना दुखविले नाही. स्वामींचे त्यांचे मठात जाणे येणे सुरूच राहिले. वामदेव सुद्धा स्वामींचे दर्शनास नित्य जाऊ लागले. रात्री कुणाला दिसू नये. म्हणून ते आंगावर घोंगडे पांघरून घेऊन स्वामींचे दर्शनास जात असत.

## वामदेवाचे मठात स्वामींचे पूजन आधी

स्वामी वामदेवाच्या मठात केव्हाही जात असत. एके दिवशी स्वामी गेले. तेव्हा त्यांना बसायला आसन रचिल्या गेले. शेजारीच वामदेवांचे आसन होते. दर्शनार्थी येत ते प्रथम स्वामींची 'बरवी' पूजा करीत. नंतर वामदेवाची पूजा करीत. प्रथम स्वामींना लोक दंडवत करीत नंतर वामदेवांना करीत. आपल्याच मठात यांची पूजा आधी होते हे त्यांना आणि त्यांचे शिष्यांना रुचले नाही. त्यामुळे यानंतर जेव्हा स्वामी त्यांचे मठात जात, तेव्हा स्वामींचे आसन आतल्या अंधाऱ्या खोलीत रचण्यात येत असे.

## स्वामींचा कीर्तिगंध दरवळू लागला

स्वामींना वामदेवाच्या मठात सन्मान मिळाला तसाच पांडेयानेही सत्कार केला.

पांडे म्हणजे नगरातील चालते-बोलते वृत्तपत्रच होते. तो गावात सांगत सुटला. स्वामी प्रत्यक्ष द्वारावतीकार श्री चांगदेव राऊळ असून त्यांचे आध्यात्मिक सामर्थ्यानेच मला (पांडेयाला) वाचविले. ही कथा पैठण नगरात पसरली. त्यामुळे स्वामींना भेटायला दर्शनार्थी लोटू लागले.

स्वामी एके दिवशी सकाळी चांगदेवाचे मंदिरात गेले. तेथे चौकात आसनावर बसले होते. तेवढ्यात तेथे कवि 'डींभ' आले. त्यांनी दंडवत घातले. श्री चरणा लागले. तेथे अनेक दर्शनार्थी आलेले होते. त्यांचे समोर कवि डींभाने स्वामीचे स्तुतिगीत गाईले.

*''तू गोसावि मी पाईक तुझा :*

*हरि हरि वाचा उच्चारण :*

*नयन निरीक्षण हृदइं एकु हरि :*
*तूं एक हरि इतुलें देइं :*
*आन न मागे कृपा सींधु मुरारी :*

कवि डींभाचे हे स्तुतिगीत गाणे स्वामींची कीर्तिपताका उंचविणारे होते. ही कीर्ती नगरभर पसरत होती.

दुसरे प्रसंगी रवळो नावाचा कुंभार डफगाणे गाण्यासाठी आपल्या साथीदारासह आला होता. त्याने वेदोपनिषदातील ज्ञानावर गाणे गाईले. त्यांच्या आध्यात्मिक गाण्यातील चूक त्याचे लक्षात आणून देऊन स्वामींनी त्याला तीन दामाचा विडा देऊन बिदा केले.

एके दिवशी चांगदेवाचे मंदिरात स्वामी मागील बाजूस आसनावर बसले होते. तेथे देवासमोर नृत्य करणारी एक नृत्यांगना आली. तिने स्वामींचे रूप पाहिले आणि ती वेधली. तिला परत जायला वेळ झाला म्हणून दुसरी आली तीही वेधली. त्यानंतर एकामागून एक सर्वच नृत्यकार स्वामीजवळ आले आणि त्यांचे दिव्य व्यक्तिमत्वाने प्रभावित होऊन ते तेथेच नाचू लागले. स्वामी त्यांना म्हणाले, तुम्ही आपल्या नेहमीच्या जागेवरच नृत्य करा. आम्ही तेथेच येऊ.

स्वामी चांगदेवाच्या चौकीत गेले. तेथे स्वामीसमोर नृत्य झाले. स्वामींनी हे नृत्य पाहिले. त्यावेळी " मांदळिया, काहाळीया, वंशकरू, चाकीकरू, आळतीकरू,जे जयाचे अंग ते तो दाखवी." त्यांचे त्या आज विस्मृत झालेल्या नृत्य प्रकारांची स्वामी स्तुती करीत होते. त्यामुळे ते आनंदित होऊन नाचत.

नाचणारी नाचत होती. तिचा ताल चुकला. तेव्हा स्वामी हसले. तिने ते जाणले. ती म्हणाली, " जाणेवीण कळा माळवलीया जी : जाणेविण कळा पोरटीया जालीयाजी : आजि कळेचे माहेर भेटले. गोसावी सकळ विद्येचे माहेर :"

स्वामींनी तिच्या चांगल्या नृत्याचा जो भाग पाहिला होता. त्याची त्यांनी स्तुती केली. तशीच तिची चूकही दाखविली होती. ती आनंदित झाली. स्वामींनी या नृत्यकारांना बिदागी देऊन सन्मानाने निरोप दिला. परंतु ते लोक स्वामींकडे वेधले होते. स्वामींना सोडून परत जाण्याची त्यांची इच्छा नव्हती.

नृत्यांगनेने स्वामींना आग्रह केला की आपण आमचे बिढारावर यावे. परंतु स्वामी म्हणाले,"आम्हाला एकाचे निमंत्रण आहे. तिकडे गेले पाहिजे."

### अवधूतास उपदेश

स्वामी चांगदेवाचे मंदिरात गेले असतां एक अवधूत वेशातला म्हणजे उघड्या अंगाचा साधू तेथे बसलेला होता. त्याचे डोळे बंद होते. स्वामींनी त्याला विचारले,'कोणत्या गुरूने असे करायला शिकवले हो? असे वेडे वैराग्य काय कामाचे? ज्ञानेविण वैराग्य ते काय करावे बापेया? उठा चालू लागा. बोलू लागा. डोळे उघडा. अशा वेड्या वैराग्याचा काहीही उपयोग नसतो, असा हितोपदेश स्वामींनी करून त्याचे तोंडात विडा घातला.

### अनेकांना भेटीची जिज्ञासा

स्वामींचे तेजस्वी व्यक्तिमत्त्व, त्यांचे प्रभावी बोलणे, त्यांचे आध्यात्मिक सामर्थ्य हे सर्व नगरजनांसाठी चर्चेचा विषय झाले होते. त्यामुळे गावातील अनेक लोक स्वामींना भेटायला येऊ लागले होते.

देईभट, लखुबाईसा, वामदेव हे नित्याचेच दर्शनार्थी होते. एकदा देईभट्टांनी सारंग पंडितांना स्वामींचे बरवेपण, चातुर्ये, सौंदर्य या संबंधी सांगितले. तेही दर्शनास आले आणि प्रभावित झाले. ग्रह सारंगपंडित, चांगदेव भट्ट, जानो उपाध्ये आदि प्रमुख प्रमुख लोक स्वामींचे दर्शनास येऊ लागले होते. चांगदेव भट आपल्या गावास जाऊन उपाध्यायांना सांगत होते, की आपण जशा पुरुषाच्या गोष्टी करीत होतो, तसेच पुरुष पैठणला आलेले आहेत. त्यांचे नाव श्री चांगदेव राऊळ असून ते साक्षात ईश्वरपुरुष आहेत.

ही त्यांची कीर्ती सर्वत्र पसरू लागली होती.

ही कीर्ती ऐकून महादेवराय यादवांचे भांडारी श्री गदोनायक स्वामींना भेटायला आले होते. तसेच कास्त हरिदेव पंडित, ब्रह्मचारीदेव, रवळो कुंभार, दाईंबा ही प्रमुख मंडळी स्वामींच्या दर्शनास येऊ लागली होती. पैठणचे नगरनाईक श्री मायताहरी हे तर स्वामींचे भक्तपरिवारातील प्रमुख झाले होते. दर्शनार्थीशी ज्ञानचर्या करून स्वामी आपल्या सुधारक विचारांची छाप त्यांचे मनावर बिंबवित असत.

### देव पुजाऱ्यांचा नाही: देव भक्तांचा

एके सकाळी स्वामीजवळ बरीच मंडळी बसली होती. बाईसांनी प्रश्न विचारला!-

''स्वामी जगन्नाथ! हे सर्व वेदवक्ते श्रीकृष्ण चक्रवर्तीना परमेश्वर मानतात. पांडित्यपूर्ण तात्त्विक चर्चा करतात, धर्म आम्हांलाच कळला म्हणून सांगतात.

धर्माचा अर्थ आमच्यापासूनच समजावून घेतला पाहिजे म्हणून सांगतात. त्यांना काही गोमटे (म्हणजे काही आध्यात्मिक लाभ) घडेल का?''

स्वामींनी आपल्या नेहमीच्या गोड लकबीत स्मितहास्य करून म्हटले, ''बाई! मंदिरात एक बडवा असतो. गुरव असतो. तो देवावरची पूजा घेतो. मंदिराचे दार उघडतो. बंद करतो. स्वच्छता तोच ठेवतो. म्हणून काय देव त्या बडव्याचा? देव भक्तांचा असतो. जो भक्ती करील त्याचा देव असतो. भक्तांनाच केवळ गोमटे घडते बाई!

## अद्वैत खंडण

पैठणला पाषाण मठ आणि काष्ठमठ, अशा दोन मठात राजगुरू महदाश्रम वेदशाळा चालवीत असत. त्यांना राजाश्रय होता. त्यांच्या वेदशाळेत विद्यार्थी वेदाध्ययन करीत असत. महदाश्रमाला देवगिरीच्या राजकोशातून वृत्ती आणि वेदशाळेसाठी अनुदान मिळत असे, महदाश्रम हा वैदिक ज्ञानाचा राजमान्य प्रवक्ता मानल्या जात होता.

स्वामी पाठशाळेत जातात तेव्हा तेथील विद्यार्थी काही पाठांतर करीत असतात. पं.महदाश्रम तेथे नसतात. स्वामी जातात तेव्हा विद्यार्थी त्यांना उत्थापन देऊन सन्मानपूर्वक आसनस्थ करतात.

औपचारिक बोलण्यानंतर स्वामी विद्यार्थ्यांना प्रश्न विचारतात,

''हे तुम्ही कशाचे पठण करीत आहांत?''- स्वामी

''जी : जी : वेदान्त.''- विद्यार्थी

''वेदान्ती काय प्रतिपाद्य?''- स्वामी

''जीः जीः आत्मा.''- विद्यार्थी

यावर बरीच चर्चा केली गेली. स्वामींनी आत्म्याची कल्पना अधिक स्पष्ट करणारे विवेचन केले. स्वामींनी आत्मा कसा स्वतंत्र आहे, ते समजावून दिले. चर्चा रंगत राहिली. पुन्हा प्रश्नोत्तरे सुरू झालीत.

''आत्मा आणि परमात्मा यात काय भेद?- स्वामी

दोन्ही एकच.- विद्यार्थी.

दोन्ही एकच असतील तर मग वैदिक कर्मकांड आणि फलोपभोगासाठी यज्ञयाग करण्याची गरजच काय?

मोक्ष- मुक्ती कुणाची? कशासाठी?

आत्मा आणि परमात्मा हे जर एकच असतील तर मोक्ष- मुक्तीचे शास्त्र तयार करण्याची गरजच काय? स्वामींच्या अशा अनेक प्रश्नांनी विद्यार्थी गोंधळून गेले होते. त्यांचा गोंधळ दूर करण्यासाठी स्वामींनी त्यांना पूर्ण द्वैताच्या तत्त्वाचा परिचय करून दिला आणि त्यांचा संशय मिटविला.

विद्यार्थी या शास्त्रचर्चेत रंगल्यामुळे त्यांचा पुढच्या कर्मकांडात्मक कार्यक्रमाला उशीर झाला होता. म्हणून महदाश्रमाने विद्यार्थ्यांना बोलविण्यास माणूस पाठविला होता. स्वामींच्या प्रवचनानंतर विद्यार्थी पुढील कार्यासाठी महदाश्रमाकडे गेले.

महदाश्रमांनी उशीर होण्याचे कारण विचारले तेव्हा मुले म्हणालीत, ''आपल्या पाठशाळेत श्रीचांगदेव राऊळ आले होते. त्यांनी ब्रह्मसूत्राच्या अनुंषगाने बरीच चांगली चर्चा केली.

त्यावर महदाश्रमाने काय चर्चा झाली ते विचारले. स्वामींच्या ''वेदी काय प्रतिपाद्य?'' या प्रश्नापासून साद्यंत चर्चा विद्यार्थी सांगत होते. त्या चर्चेत महदाश्रम जागजागी निरुत्तर होत होते. ही अशी अडचणीची स्थिती यापूर्वी कधी आली नव्हती. मुले 'बाबावाक्यं प्रमाणम्' मानायचे. आज मात्र ते अनेक प्रश्न उपस्थित करून महदाश्रमांना अडवू लागले होते. त्यामुळे महदाश्रम अवघडल्यासारखे झाले होते. त्यांचे मनात प्रश्न उपस्थित झाला की असेच जर हे चांगदेव आमच्या विद्यार्थ्यांना 'द्वैत' समजावून देऊ लागले तर आमच्या पाठशाळेतील विद्यार्थी त्यांचाच मार्ग अनुसरू लागतील. अशाने ते आमचा अव्दैताचा मार्ग उच्छेदितील. या शंकेने अस्वस्थ झालेले महदाश्रम आपल्या घराकडे निघून गेले.

दुसरे दिवशी पुन्हा शिष्य महदाश्रमावर प्रश्नांचा भडिमार करू लागलेत. आज आत्मा या विषयावर विद्यार्थ्यांनी चर्चा सुरू केली होती. महदाश्रमांना त्यांच्या प्रश्नांची उत्तरे देता आली नाहीत. त्यांनी तोही दिवस कसा तरी पुढे ढकलला.

तिसरे दिवशी व्दैत आणि अव्दैत या दोन परस्परविरुद्ध मतांचे साधार खंडन-मंडन करणारी तर्कसंगत चर्चा श्री चांगदेव राऊळांनी मठात येऊन केलेली असते. त्यामुळे विद्यार्थी चर्चेत अद्वैताचे खंडण करण्यासाठी तयार झालेले असतात. महदाश्रम मठात येतात तेव्हा पुन्हा विद्यार्थी ती चर्चा सुरू करून महदाश्रमाची तर्कसंगत अडवणूक करू लागले. हे पाहून पुन्हा महदाश्रम म्हणाले, ''काय आजही ते चांगदेव येथे येऊन गेले होते काय? त्यावर होकारार्थी उत्तर आले आणि

महदाश्रमाचे पोटात असूयाजन्य क्रोधाग्नी पेटला.

अद्वैताचा प्रवक्ता मानल्या जाणाऱ्या माझेसारख्या राजगुरूला आपल्या शिष्यांनाही अद्वैत सिद्धांत समजावून देता येत नाही, असे जर लोकांना कळले तर? या भयसूचक प्रश्नाने महदाश्रम अस्वस्थ झाले. या बेचैन अवस्थेत त्यांनी शिष्यांशी चर्चा करण्याचे थांबविले. आता हा चांगदेव उपाख्य चक्रधर आपल्या अद्वैतवादाचा उच्छेद करणार असा भीतीचा गोळा त्याचे पोटात उठला. ही भीती त्यांचे मनात घर करून बसली आणि ते यावरचा उपाय शोधण्यासाठी घरी जाऊ लागले. अद्वैताच्या बिनतोड युक्तिवादाचा शोध घेऊनच चक्रधरांच्या या वैचारिक आक्रमणाला तोंड देता येईल असे इतरांनी त्याला सूचित केले. त्यासाठी देवगिरीच्या पंडितांशी चर्चा करून यावर मार्ग शोधण्याचा त्याने विचार पक्का केला. तो पैठणच्या सर्व वैदिक विद्वानांना सांगू लागला की आता हे आमचा मार्ग उच्छेदितील, याचा बंदोबस्त केलाच पाहिजे. त्यावर उपाय शोधण्याच्या चिंतेत महदाश्रम असतानाच श्री चक्रधरांनी पैठण सोडले.

**श्रीचक्रधरांचे रिध्दपूरकडे प्रस्थान**

श्रीचक्रधरांची एकाच गावात फार काळ राहण्याची प्रवृत्ती नव्हती. त्यामुळे ते पैठणवरून आपले ऊर्जास्थान श्री क्षेत्र रिद्धपूरकडे निघाले. रिद्धपूरला ते परमेश्वरपूर म्हणायचे. येथे श्री गोविंदप्रभु राहत होते. त्यांचेकडून स्फूर्ती आणि प्रेरणा घेऊनच ते धर्मप्रवर्तनासाठी एकांतातून लोकांतात आलेले होते. त्यांनी पैठणला आपल्या कार्याचे बीजारोपण केल्यावर ते आता पुनश्च रिद्धपूरकडे निघाले होते.

रिद्धपूरकडे श्रीप्रभूंच्या भेटीने त्यांना खूप उर्जेचा लाभ झाला होता. श्रीप्रभु म्हणाले होते, ''हां ओः तू देओ होय म्हणेः हा देओ होय म्हणेः'' असा श्रीप्रभूंनी श्रीचक्रधरांना देवत्व बहाल करणारा अभिप्राय व्यक्त केला ही प्रशस्ती स्वामींना आपले कार्य करण्यासाठी मिळालेली मोठी ऊर्जा होती. ही ऊर्जा घेऊन स्वामी परत गंगातीराकडे निघाले.

स्वामीसोबत यावेळी बाईसा, चांगदेव भट्ट आणि इतर भक्तगण होते. त्यांनी लवकरच रिद्धपूर सोडले. बेलोरा, शिराळा, टाकरखेडा, आष्टी, वाठोडा, मांगरौळी, सेंदुरजन, डोड विहिरा, फुलंब्री, गदाना आणि वेरूळच्या लेण्या असा त्यांनी प्रवास केला आणि ते वेरूळच्या लेण्यात येऊन थांबले. राजविहार नावाच्या लेण्यात त्यांनी मुक्काम थाटला. परंतु रात्री त्या एकांतात भयावह असा आवाज

होतो, अशी बाईसा आणि इतरांची तक्रार होती. म्हणून त्यांनी आपले बिढार चतुर्विधाचे मठात हलविले. तिथे दहा महिने निवास झाला.

**दर्शनार्थ्यांची गर्दी वाढू लागली.**

बळ्हेग्रामचे महाजन राजकामानिमित्त देवगिरीस आले होते. त्यांचेसोबत रामदेव दादोस होते. दादोस (रामदेव) हे स्वामींचे एकांकातील शिष्य होते. वडनेरजवळील आमजय या गावी त्यांना आनंददायी स्थिती प्राप्त झालेली होती. ते बळ्हेग्रामच्या महाजनांसह देवगिरीत आले होते. तेथे त्यांना कळले की वेरूळच्या लेण्यात स्वामी आलेले आहेत. त्यामुळे ते महाजनांसह स्वामींना भेटायला आले होते. त्यांच्यासह उपाध्ये, जापीए विष्णू भट्ट, आपदेव भट्ट, जनक नरसिंह भट्ट, पदकर नागदेव भट्ट, भागवत रवळो, नाथोबा, कमळनायकु, या सर्व मंडळींनी स्वामींचे दर्शन घेतले. ते परतून गेल्यावर त्यांनी स्वामी वेरूळच्या लेण्यात राहत आहेत असे देवगिरीत सांगितले. त्यामुळे स्वामींची कीर्ती ज्यांचे कानावर या आधीच गेलेली होती, ते सर्व दर्शनार्थी येऊ लागले. देवगिरीच्या राजदरबारातील बरेच लोक दररोज येऊ लागले होते.

स्वामींना भेटायला पैठणचे सारंगपंडित आले होते. ते पैठणला परत गेले. त्यांनीही स्वामी वेरूळला असल्याची वार्ता देवगिरी आणि पैठणला सांगितली होती. त्यामुळे स्वामींच्या दर्शनाला येणारांची संख्या अधिकच वाढली. पूर्वीच पैठणहून सारंगपंडितासह मोकानंद, एकाईसे, देमाईसे, घोडे, इत्यादी लोक स्वामींचे दर्शनाला आले होते. तसेच देवगिरीहून शालिवाहन हे सेनानायक आले होते. ते देवगिरीच्या महादेव रायाचे पदरी 'राऊत' होते. ते हटयोगी होते. स्वामीकडे आले तेव्हा त्यांनी नाकातून कोणता स्वर सुरू आहे ते पाहिले होते. स्वामीजवळ येऊन बसले तेव्हाही 'स्वर' पाहिला होता. नाडी (स्वर) पाहून बसण्याची तसेच नाडी पाहून उठण्याची त्यांना सवयच झाली होती. बोलतानाही ते सतत स्वरभान ठेवत होते. ही गोष्ट स्वामींच्या लक्षांत आली. स्वामींना दंडवत प्रणाम करून ते स्वामींचे सन्मुख बसले. तेव्हाही ते नाडी फुंकून बसले होते. त्याने स्वामींना विचारले,

"जीः जीः हटु जाणा?"

स्वामींनी मानेनेच नकार दर्शविला. त्यावर तो म्हणतो,

"मग स्वामी काय जाणतात?"

“हे नेणे:”- स्वामी

स्वामींच्या या नकारानंतर स्वामी त्यांना विचारतात,

“तुम्ही हठयोग जाणता?”

त्यावर तो म्हणतो,“ होय! हठयोग आम्ही चांगला जाणतो.”

“सांगा पाहू आम्हांस!”- स्वामी.

तो सांगू लागला. जारक, पूरक, कुंभक, त्राहाटक हे सर्व आम्ही जाणतो. त्यावर स्वामींनी विचारले,

“हे जर तुम्ही जाणता तर मग तुमचे कान इतके जीर्णावस्थेत कसे आलेत? त्यावर तर म्हातारपणाची कळा स्पष्ट दिसू लागली आहे. या स्वामींच्या अभिप्रायामुळे शालिवाहन वरमला व नम्रपणे म्हणाला,

“आम्ही हे सर्व जाणतो खरे परंतु या वृद्धत्वाच्या खुणा आमच्या आळसामुळे दिसून येऊ लागल्या आहेत. त्यावर स्वामींनी स्मित हास्य करून म्हटले,“हठयोग असा नसतो. तो कसा असतो ते ऐका! हटामुळे वयस्तंभन होते. मृत्यूवर विजय मिळतो. हठयोगाचा अभ्यास सुरू करताच म्हातारपणाची लक्षणे, सुरकुत्या पडणे आणि केस पांढरे होणे हे थांबते.जे हठयोग अभ्यासतात त्यांना ते सांगण्याची गरजच नाही. ते आपोआपच त्यांचेकडे पाहिल्यावर स्पष्टपणे दिसून येते.

स्वामींची सतेज काया आणि वयस्तंभनामुळे ‘अजर’ तारुण्याची प्रभा स्पष्टपणे पाहून शालिवाहन ओशाळून म्हणतो,

“स्वामी महाराज! हे सर्व सांगण्याचा आपला अधिकार आहे. तो आम्हाला अधिकार नाही. हठयोगाचा अहंकार धरण्याचा आम्हांला अधिकार नाही. त्याचे पूर्णपणे गर्वहरण झालेले होते. त्याने स्वामींना नम्रपणे दंडवत प्रणाम केला आणि त्यांच्या अनुमतीने तो देवगिरीकडे निघाला.

हा आणि अशी बरीच ‘राजिके’ नित्यदिनी वेरूळास स्वामींना भेटायला येऊ लागलीत. दररोज गर्दी वाढतच होती. लेण्यांचे परिसरात राजपुरुषांच्या पालख्या थांबू लागल्यात. पालख्यांची गर्दी अपार होऊ लागली होती. चरित्रकार लिहितात,“दांडीशी दांडी भिडत असे.” अशी राजपुरुषांची गर्दी स्वामींचे दर्शनासाठी सतत वाढतच होती.

## गोपाळ पंडिताची शरणागती

स्वामींच्या विद्वत्तेची आणि सर्वज्ञतेची कीर्ती सतत वाढत होती. वेरूळच्या लेण्या या कटक-देवगिरीच्या पायथ्याशीच असल्यामुळे कटकात राहणारे राजपुरुष स्वामींचे दर्शनाला सतत येत होते. असेच एक दिवस सारंग पंडिताचे सोबत गोपाळ पंडित नावाचे विद्वान पंडित स्वामींचे दर्शनाला आले होते. गोपाळ पंडित हे महादेवराव यादवांच्या राजसभेतील एक महत्त्वपूर्ण व्यक्तिमत्त्व होते. ते राजपंडित होते. सारंग पंडितांनी स्वामींना दंडवत केला व स्वामींचे सन्मुख बसले. राजपंडित गोपाळ पंडित मात्र बाजूस येऊन बसले. स्वामींनी सागरपंडितांना विचारले, ''पांडेया हे कवण?'' ''ज़ीः जीः हे गाझे मित्र! हे शास्त्र वक्ते! हे बरवे बोलो जाणतीः'' यावर स्वामींनी विचारले, ''काय बोलतात? काय जाणतात? शास्त्राधार उबेणे?'' त्यावर गोपाळ पंडित म्हणाले,

''जीः जीः मी पारधीचे वक्तृत्व जाणेः''

त्यावर सर्वज्ञ श्रीचक्रधर स्वामींनी विचारले, ''सांगा पाहू!'' मग त्यांनी सावजाचा यावा आणि धुरेचा लादू कसा तरी वर्णन केला. त्यात नावीन्य काहीच नव्हते. त्यांची माहिती अगदीच किरकोळ होती. ती ऐकून स्वामी म्हणाले,

''पारधी काई इतुकीची गा?'' हा अनपेक्षित प्रश्न ऐकून गोपाळ पंडित ओशाळल्यासारखे झाले. त्यावर स्वामींनी पारधीच्या म्हणजे शिकारीच्या शास्त्राचे निरुपण केले, ते म्हणाले,

''जाड, वाड, कोड, कौतिक हे पारधीचे प्रकार आहेत. जाड पारध सोराची, हत्तीची, वाड पारध वाघाची, सिंहाची, कोड पारध हरिणा-रोहियांची आणि कौतुकाची पारधी ती सशांची, तितरांची, मासेयांची!

गोपाळ पंडित प्रभावित झाले होते. ते म्हणाले, ''महाराज! जाड पारधी कशी असते त्याचे निरुपण करावेजीः''

यावर स्वामींनी 'सावजाचा यावा' सांगायला सुरुवात केली. सावजाचा हाकारा करण्यासाठी आवाज काढून दाखविला. तो आवाज ऐकून सावज कसा आवाज काढते ते सांगितले. हे ऐकून बाईसादि भक्तगण भ्याले.तो भयावह आवाज ऐकून भक्तगण पळून गेलेत. तेथे काही राणे-राऊत बसलेले होते. तेही सावरून बसलेत. हे प्रत्यक्ष शिकारीचे दृश्य उभे करणारे आणि प्रत्यक्षानुभूती देणारे थरारक नाट्य होते. उपस्थितांचे अंगावर शहारे आणणारी रौद्र-रस-निष्पत्ती केल्यामुळे

सर्वांना भयभीत झालेले होते. अशा वेळी स्वामींनी हास्य करून तो रस आवरला.

नंतर स्वामींनी टप्प्यात आलेले सावज मारायचे कसे ते सांगून सावजाचे पवित्रे म्हणजे [illegible] लाहू कसा घ्यावा ते साभिनय सांगितले. हे वीररस निष्पत्ती करणारे नाट्य प्रत्यक्ष पाहणाऱ्या राऊत आणि पाईकांचे अंगात स्फुरण चढले होते. गोपाळ पंडितांचे हात न कळत त्यांचे तलवारीचे म्यानाकडे गेले होते. तसेच ते [illegible] होते.

गोपाळ पंडित हे ऐकून आणि पाहून तर थक्कच झाले होते. असा हा भारावून गेलेला, [illegible] सर्वज्ञ म्हणविणारा पंडित हात जोडून म्हणाला, "महाराज हे असे काही आम्ही आजवर ऐकले सुद्धा नव्हते. पारधीचे [illegible] असते याची कल्पनाही मला नव्हती. आपण माझे डोळे उघडले. मी या [illegible] तज्ज्ञ नाही. मी राजसभेत राजाचे मनोरंजन करण्यासाठी [illegible] पंडित आहे."

स्वामींनी त्यांची [illegible] पाहण्यासाठी म्हटले, "पंडितहो! काव्यशास्त्रात [illegible] रस आहेत ना?"

'नवरस' - गोपाळ पंडित.

"दहावा तो भक्तिरसु की. तो आम्ही तुम्हांला समजावून सांगू. तत्पूर्वी तुम्ही आम्हांला काही अलंकारांची माहिती द्या पाहू!" - स्वामी.

महाराज! मी या काव्यशास्त्रातही तज्ज्ञ नाही. त्यात मी पारंगत नाही. चार-दोन महत्त्वाचे अलंकार तेवढे मला माहिती आहेत.- गोपाळ पंडित.

स्वामींनी काव्यातील भक्तिरस आणि इतर अलंकारांचे सविस्तर वर्णन केले. ते त्यांचे अलंकारांचे वर्णन अपूर्व होते. स्वामींनी अलंकार शास्त्रानुसार काव्यालंकारांचे विविध प्रकारही सांगितलेत. ते प्रकार पुढे महानुभाव साहित्यात रूढ झालेत. ते आजच्या मराठी आणि हिन्दी भाषेतील अलंकारापेक्षा बरेच अधिक आहेत. त्यातले काही असे पंक्ती, मद्र, मनोहरा, मदलेखा, चित्रकला, दशा, कन्द पंक्ति, रामाचंद्रशेखर, चंदनवल्ली, सानंद, उद्धता, तरंगिणी, सुरमा, पादाकुलक, चौपाई, सुंदरा, चंपक ललिता, संभोग, गौरी, वनमाला, ज्वाला, चंद्रकळा, नटतोटक, मुक्तवल्ली, रमण, राग, भुजंगलतिका, फणिंद्र, दंडक, इंदुवदना, नाटकमालती, गंधानक, सुमुखा, हंसिनी, हरिकछंद, ललित मित्र आणि अजून बऱ्याच अलंकारांची नावे स्वामी सांगत होते. आणि हा राजपंडित स्तंभित होऊन

ऐकत होता. स्वामींच्या या अतुलनीय बहुश्रुतपणाचा प्रत्यय आल्यामुळे तो त्यांना म्हणाला, ''महाराज आपण सर्वज्ञ आहांत. आम्ही या इतक्या अलंकारांची नावेसुद्धा कधी ऐकली नव्हती. आपण त्यातले तज्ज्ञ आहात. आपण थोर आहात. आज आपले दर्शनाने आम्ही धन्य झालोत. आम्ही आपले चरणी विनम्र भावे दंडवत करतो. आशीर्वाद द्यावेत महाराज !

**गदोनायकांची फळे**

एके दिवशी पैठणचे सारंगपंडित स्वामींचे दर्शनास आले. ते स्वामींचे दर्शनास यायला निघाले तेव्हा त्यांना गोदानायकांनी विचारले होते की, तुम्ही कोठे जात आहांत? त्यावर सारंग पंडितांनी सांगितले की आम्ही श्रीचक्रधर स्वामींच्या दर्शनास वेरूळला जात आहोत. ते महान अवतारी सत्पुरुष असून सर्वज्ञ आहेत. ते सकलविद्या संपन्न आहेत. त्यांचा आध्यात्मिक अधिकार फार थोर आहे. हे सांगितल्यावर गदोनायक म्हणाले की आम्हांस महादेवरायानी ही काही फळे दिलेली आहेत. त्यांना कुण्या तरी परदेशी राजपुरुषांनी भेट दिलेली होती. या फळांची ओळख राजसभेतील कुणालाही नव्हती. याचे नावही माहिती नाही. ती राजाने मला दिली. तुम्ही सांगता तसे श्रीचक्रधर हे जर सर्वज्ञ असतील तर त्यांना ही फळे भेट द्या व यांचे नाव विचारा.

गदोनायक हे महादेवराव यादवांचे भांडारी होते. ते राजासह करमणुकीकरिता जुगारसुद्धा खेळत. इतके ते राजाचे निकटचे अंतरंग स्नेही होते. त्यांनी सारंग पंडितांना दिलेली फळे सारंग पंडितांनी स्वामींना अर्पण केली.

स्वामींनी फळे स्वीकारली आणि म्हणाले, ''पांडेया! हे कायसेयाची फळे गा?

याचे नाव माहिती नाही ते आपणच सांगावे म्हणून गदोनायकांनी ती आपणांस देण्यासाठी मला दिलेली आहेत. ती राजसभेत महादेवराव यादवांना कुणीतरी परदेशी माणसांनी भेट दिली. राजसभेत कुणालाही या फळाचे नाव सांगता आले नाही. त्यांनी 'गदोभांडारीयास' ती दिली. त्यांनी ती मला दिली. मी आपणास अर्पण केलीत. आपणच त्याचे नाव सांगावेजी!- सारंग पंडित म्हणाले.

स्वामींनी फळ हातात घेऊन म्हटले याचे नाव 'रितुपे' आहे. फळाचे हे नाव नवीन होते. सारंग पंडितांनी हे नाव गदोनायकांना सांगितले. त्यांना स्वामींच्या सर्वज्ञतेचा प्रत्यय आला व म्हणूनच ते पुढे स्वामींचे निष्ठावंत भक्त बनले आणि

अंतिम क्षणापर्यंत स्वामींचे भक्त राहिलेत.

## माईबाईसांचे दुःखहरण

माईबाईसा नावाची एक बाई होती. तिचे वसमत हे राहण्याचे गाव होते. तिचा नवरा वारला होता. तरुण मुलगाही वारला होता. घरी संपत्ती होती ती 'राजाने' नेली. तिला दोन मुली होत्या. मोठीचे नाव एकाईसे! ही विधवा झाली होती. म्हणून ती माहेरी आली होती. लहान लेकीचे नाव जसमाईसा! तिला पिशाच्चबाधा झाली होती. तिचे अंगात भूत येत असे. त्यामुळे ती आपल्या नवऱ्याला आवडत नव्हती. सासु-सासऱ्यांनाही आवडत नव्हती. दीरासही आवडत नव्हती. त्यामुळे माईबाईसांनी तिला माहेरी आणले होते. या दोन्ही मुली घरी आल्यामुळे या विधवा बाईला अतिशय दुःख होत होते. साधन-संपत्ती नाही. घरात माणूस नाही. तरुण देखणा मुलगा वारल्याचे दुःख होतेच. अशा अवस्थेत अत्यंत दुःखात असहाय जीवन जगण्यापेक्षा मरण बरे असे तिला वाटले. त्यावेळी वसमतवरून द्वारकेला यात्रिकांचा पोहा निघाला होता. दुःखीकष्टी माईबाईसांनी ठरविले की दोन्ही मुलींसह द्वारकेला जायचे. एकीला पोटाशी बांधायचे व दुसरीला पाठीशी बांधून द्वारकेच्या समुद्रात उडी घेऊन जलसमाधी घ्यायची. या दुःखार्त भावनेने ती या मुलींना घेऊन निघाली होती. वाटेत प्रतिष्ठानला पोहा थांबला.

सारंगपंडित हे या बाईचे नातेवाईक होते. ती त्यांचेकडे गेली. त्यांना आपले दुःख सांगून ती म्हणाली की मी आता एकीस पाठीशी अन् दुसरीस पोटाशी बांधून द्वारकेच्या सागरात जलसमाधी घेण्यासाठी निघाली आहे.

सारंगपंडितांना या असहाय दुःखी बाईचे दुःखाची तीव्रता जाणवली होती. ते तिला म्हणाले, ''बाई, तुम्ही असे काही करण्यापूर्वी जातांना रस्त्यात वेरूळच्या लेण्यात जा. तुमचा पोहा त्याच वाटेने पुढे जाणार आहे. तिथे श्रीचक्रधर स्वामी आहेत. त्यांच्या आध्यात्मिक सामर्थ्यांने तुमच्या सर्व दुःखांचे निरसन होईल. म्हणून त्यांचे दर्शन घेऊनच पुढे यात्रेला जा.

माईबाईसा वेरूळच्या लेण्यात स्वामींचे दर्शनास गेली. दोन्ही अभागी मुली होत्या. स्वामींचे दर्शन घेऊन तिने आपली दुःखद कर्मकहाणी सांगितली. शेवटी ती म्हणाली, ''आता मी एकीला पोटाशी व दुसरीस पाठीशी बांधून द्वारावतच्या सागरात जलसमाधी घेऊन जीवनयात्रा व त्यासोबतच दुःख संपविणार आहे.

आपले आशीर्वाद असावेत म्हणून सारंगपंडितांनी आपणांस भेटायला सांगितले होते. आशीर्वाद द्यावेत महाराज! माईबाईसा आणि तिच्या दोन्ही मुलींनी स्वामींना साष्टांग दंडवत घातले.

"मी आपले दर्शन घेऊन धन्य झाले. माझा मुलगा आपणासारखाच सुंदर होता. त्याचे असेच हात होते.असेच डोळे होते.असेच मोहक सुंदर तोंड होते." असे म्हणून माईबाईसा दुःखातिरेकाने हुंदके देऊन ओक्साबोक्सी रडू लागली.

स्वामी म्हणाले, "बाई दुःख करू नका. दुःख म्हणजे पापच! पापातव नरक! सोन्याची फळी पोटाला बांधून पाण्यात उडी घेतली तर काय आपण तरू? तिच्यामुळे आपण बुडणारच की! म्हणून दुःख करू नका."

स्वामींच्या या समजावणीच्या शब्दांनी तिचे दुःख पार नाहिसे झाले. त्यांनी दिलेले तीर्थ आणि प्रसाद घेऊन माईबाईसा आपल्या मुलीसह आपल्या बिढारावर गेल्या. सकाळी पुन्हा आल्या. तेव्हा स्वामी म्हणाले, "बाई रात्री काही उपद्रव झाला होता का?"

"नाही बाबा! रात्री तिचे अंगात कावरे आले नाही."

स्वामी म्हणाले, "जा, आता तुमचे दुःख दूर झाले. हिचे कावरे गेले. आता द्वारावतीचा पोहा निघाला, तुम्ही त्यासह जा!

त्यावर माईबाई म्हणाली, 'नाही महाराज, आता आम्हांला येथेच द्वारावती आहे. आमचा कन्हैया आम्हास येथेच भेटला जी!

त्यावर स्वामी म्हणाले, 'आता तुम्ही या मुलीस तिच्या सासुरवाडीस पाठवा!'

'नाही महाराज! तेथे पाठविणे कठीण आहे. ही सासुसासऱ्यास आवडत नाही. कोणालाही हिच्या बद्दल आस्था-प्रेम नाही. त्यानी हिला घरातून काढून दिले.'-माईबाईसा

'आता पाठवा. ते तिला चांगले वागवितील. तुम्ही हिला पोहचवून द्या!'-स्वामी.

माईबाई मुलींना घेऊन पैठणला गेली. सारंगपंडितांनी मुलीला कापड-चोपड देऊन सोबत घोडे दिले. माणसे दिलीत. ती तिच्या गावी पोहोचली तेव्हा गावातील लोकांनी तिचे उत्तम स्वागत केले. तेथे ती सुखाने नांदू लागली. नावडती मुलगी आपले कुटुंबात आवडती झाली.

असे सर्वसामान्य जनांचे दुःख दूर करण्याचे काम स्वामी सतत करीत होते.

## मृत माळी जिवंत केला

असेच एकदा एक माळीण आक्रोश करीत स्वामींचे चरणावर लोटांगण घालून दुःख करू लागली. तिचा पती सर्पदंशाने वारला होता. ती रडत होती. रडता रडता म्हणत होती की मला आता दुसरे कोणी नाही. हा माझा आधारच निखळला आहे. मी कुणाच्या आश्रयाला जावं. देवा आपण आता या माझे पतीला जिवंत करावे जी.

या बाईचा शोक पाहून स्वामींचे दयार्द्र हृदय द्रवले. त्यांनी म्हटले, 'बाई रडू नका. हे असे घडले तो नियतीचा खेळच आहे. जन्माला येतो,तो जातोच ना एकदा! त्याचेसाठी तुम्ही पुन्हा दुःखी होऊ नका.' त्यावर ती बाई अतिशय आर्त हंबरडा फोडून म्हणाली, ''बाबा! मला माझ्या म्हातारपणीच्या आधारासाठी माझा पती परत द्याहो. याला जिवंत करा हो.'' तो आर्त हाकेचा हंबरडा ऐकून हा दीनानाथ द्रवला. आणि शेजारच्या कमंडलूतील पाणी तिचे जवळ देऊन शवावर शिंपडण्यास सांगितले. त्या बाईने मृत माळ्याचे तोंडावरचे पांघरूण बाजूस करून त्यावर पाण्याचा शिडकावा केला.

आणि काय आश्चर्य, माळ्याने डोळे उघडले अन् तो उठून स्वामींचे पायावर पुन्हा लोटांगण घालू लागला. तो जिवंत झालेला माळी म्हणाला, ''आपण मला पुन्हा जन्म दिला.''

उपस्थित लोकांनी हे आश्चर्य पाहिले होते. स्वामींचे दैवी सामर्थ्य पाहून लोक प्रभावित झाले होते. ते सर्वजण स्वामींना दंडवत करू लागले. ही कीर्ती कानोकानी सर्वत्र पसरली. अशीच एक घटना स्वामींचे एकांक भ्रमणातही घडली होती.

## वामन पेंधीयांच्या मृत पत्नीस जिवंत केले

स्वामी एकांत काळात फिरत असताना राहेर (जि. नांदेड) येथे भिक्षेसाठी जात असत. तेथे वामनपेंधी नावाच्या ब्राह्मणाचे घरीही भिक्षेस जात असत. त्यांची पत्नी अत्यंत आदराने भिक्षा वाढायची. ती वारली. तिचे प्रेत स्मशानात आणले होते. तेथे तो ब्राह्मण दुःख करीत होता की आता स्वामी भिक्षेसाठी येतील तर त्यांना कोण भिक्षा वाढील? त्याला बरीच मुले होती. त्यांना कोण खाऊ घालील. याचेसाठी तो दुःख करीत नव्हता तर स्वामींना भिक्षा कोण वाढील, यासाठी तो दुःख करीत होता. रडत होता.

स्वामी एका वृक्षाखाली बसले होते. वामनपेंध्याना स्वामी दिसले. तो रडत रडतच त्यांचेकडे गेला. दंडवत करून त्यांचे चरणावर लोळून म्हणाला, "स्वामीजी! तुम्हाला भिक्षा वाढणारी ब्राह्मणी गेली हो! आता तुम्हास पाणिपात्र भिक्षा कोण देईल जी? "चला पाहू!" स्वामी म्हणाले आणि सरणापर्यंत आले. स्वामींनी बाईचे अंगावरून हात फिरविला. मग तिचा हात हातात घेऊन ते म्हणाले, "बाई उठा नां! तुमचेकडून एक पाणिपात्र भिक्षा आम्हास घेणे राहिली आहे. उठा!"

स्वामींची ही हांक ऐकताच बाई सरणावरच उठून बसली. लोक आश्चर्याने पाहतच राहिले. ती सरणावरून उतरून घरी निघाली. घरी येण्याचे निमंत्रण देण्यास वामनपेंधीयास पाठविले. स्वामींनी तिच्या भिक्षान्नाचा स्वीकार केला. आणि स्वामी तेथून निघाले.

**चांभाराची पूजा करविणे**

असेच एकदा स्वामी एका पाणपोईवर बसले होते. एक चर्मकार आणि त्याची पत्नी बाजार करून घराकडे परत जात होते. ते पाणी पिण्यास पाणपोईवर थांबले. पाणी पिऊन झाल्यावर चर्मकार पत्नी घराकडे जाण्यासाठी आपले सामान ठेविलेली पाटी घेऊन उभी राहिली. ती चर्मकारास म्हणाली, "चला घरी जाऊ या!"

परंतु चर्मकार मात्र श्रीचक्रधर स्वामीकडे पाहतच राहिला.स्वामींचे सौंदर्य आणि लावण्यपूर्ण मुखचंद्रावरून त्याची नजर ढळत नव्हती. तो भारावल्यासारखा पाहत होता. त्या भावावस्थेला लीळाचरित्रात 'स्थिती' म्हटलेले आहे. त्या स्थितीत त्याला एक आगळा-वेगळा स्थित्यानंद प्राप्त होत होता. तो त्या अवस्थेतून बाहेर पडल्यावर त्याचे कानात पत्नीच्या जळजळीत शब्दांचे बाण शिरले. ती म्हणाली,'सांगा. तुम्ही घराकडे येता की जाऊ मी एकटीच. तुम्ही येणार नसाल तर हा माझा काडीमोड समजा.'

चर्मकार निर्विकार मनाने म्हणाला, "हरकत नाही." झाले, तिने एक काडी घेऊन ती मोडली आणि टोपली घेऊन गावाच्या वाटेने ती निघून गेली.

स्वामींच्या कृपेने तो चर्मकार पुनश्च भावावस्थेत गेला. त्याच अवस्थेत तो शेजारच्या गावात पोहोचला. तो भावावस्थेत असल्यामुळे लोक त्याला देवपुरुष समजून वंदन करू लागले. त्याला आपले घरात नेऊन त्याची पूजा करू लागले. त्या पूजकांत गावातील ब्राह्मणच अधिक होते. अशी पूजा चालली असताना त्या

गावात एक वाटसरू आला. त्याने त्या चर्मकाराकडे पाहून म्हटले, ''अरे हा तर आमचे गावचा चर्मकार आहे. या गावातील ब्राह्मण याची पूजा करतात. याने येथे भ्रष्टाभ्रष्ट केले.''

हे ऐकल्यावर ब्राह्मण मंडळी विचारात पडली. याने आपणास बाटविले अशी त्यांची समजूत झाली. स्मृतीच्या कायद्यानुसार अस्पृश्याची पूजा करण्यामुळे ते ब्राह्मण भ्रष्ट झाले होते. त्यामुळे चर्मकारास काय शिक्षा करावी याचेकरिता ब्राह्मणांनी शास्त्राची पुस्तके पाहिलीत. स्मृतींची साक्ष काढली. त्यात असे लिहिले होते की असा कोणी शूद्र भ्रष्टाभ्रष्ट करताना आढळला तर त्याला जिवंत चुनाभट्टीत घालून त्यावर पाणी ओतायचे व त्याला मृत्यूदंड द्यायचा. हे शास्त्रप्रमाण पाहून गावातील प्रमुखांनी त्याला चुन्याचे भट्टीत घातले आणि वरून पाणी ओतले. तो मेला अशी खात्री झाल्यावर लोक तेथून घराकडे गेले.

दुसरे दिवशी त्या गावातील लोक शेजारच्या मोठ्या बाजाराच्या गावी गेले. त्यांनी तेथे पाहिले की तोच पुरुष या बाजारात गळ्यात पुष्पमाला घालून मिरवित आहे. लोक त्याला वंदन करीत आहेत. ही गोष्ट पाहून या लोकांना आश्चर्य वाटले.

असा हा चमत्कार करून श्रीचक्रधरांनी त्या काळच्या तथाकथित शूद्र समजल्या जाणाऱ्या माणसाची पूजा करवून घेतली. जगात कोणतीही जाती जन्माने श्रेष्ठ नाही वा कनिष्ठ नाही हेच त्यांना लोकांना दाखवून द्यावयाचे होते. हा स्वामींचा विचार त्यांनी अनेकदा बोलून दाखविला होता.

ही त्यांची दृष्टी होती. तिच्या पुरस्काराकरिता ते स्पष्ट म्हणायचे की ''कर्मचांडाळा पसि जाती चांडाळु चांग :''

**वेरूळला गर्दी वाढली : राजसभा ओस पडली.**

महादेवराय यादवांची राजसभा रोज भोजनोत्तर होत असे. एके दिवशी राजे राजसभेत आले. आणि पाहतात तो राजसभेत तोलामोलाचा एकही राजिका उपस्थित नव्हता. राजसभेत शे-पाचशे लोकांची उपस्थिती असावी तिथे २५-३० लोकच दिसले. राजाला आश्चर्याचा धक्काच बसला. राजा म्हणाला, ''आज आमच्या सभेत कुणीच नावारूपाचा राजिका दिसत नाही. कुठे गेलेत हे सर्व? 'जो ज्या ओळगेचा तो त्या ओळगे न देखो : हे काई?' असा संतप्त प्रश्न त्याने विचारला. त्यावर एक राजाधिकारी म्हणतो, ''क्षमा असावी महाराज! आपल्या

वेरूळच्या लेण्यात एक सत्पुरुष आलेले आहेत. त्यांचे दर्शनार्थ हे सर्व लोक नियमित जात असतात. त्यामुळे त्यांना यायला उशीर होतो.

ते पुरुष कोण?- राजा.

त्यांचे नाव व्दारावतीकार श्री चांगदेव राऊळ असे सांगतात. त्यांना लोक श्रीचक्रधर या नावानेही संबोधितात. त्यांचे व्यक्तिमत्त्व आकर्षक आहे. तसेच त्यांची सर्वज्ञता अपूर्व आहे. ते विद्वान आहेत. तसेच ते बहुश्रुतही आहेत. त्यांचे आध्यात्मिक सामर्थ्यही फार मोठे आहे. त्यांच्याकडे बरेच लोक आकर्षित झालेले आहेत. आपले राजपंडित श्री गोपाळपंत त्यांच्या विद्वत्तेने प्रभावित होऊन त्यांना अनुसरले आहेत. आपले सेनानायक पाल्हाडांगीया, शालिवाहन, राजभांडारी श्री गदोनायक, सारंगपंडित, मायता हरिनायक असे अनेक नावारूपाचे राजपुरुष त्यांचे प्रशंसक झालेले असून ते त्यांना अनुसरले आहेत. इतक्यात पाल्हाडांगिया, शालिवाहन, गदोनायक, गोपाळ पंडित आणि इतर बरेच लोक राजसभेत येऊन आपआपल्या रांगेत येऊन उभे राहिलेत.

राजे महादेवराय पाल्हाडांगियाकडे वळून विचारतात. ‘‘सेनापती! सभेला यायला आपण बराच उशीर केला. कुठे गेला होता आपण सर्वजण?

पाल्हाडांगिया राजास विनम्र अभिवादन करून म्हणतात,‘‘अभय असेल तर सांगण्याची अनुज्ञा असावी महाराज.’’ ‘‘अभय आहे व अनुज्ञाही आहे. सांगा.’’- राजे.

महाराज वेरूळात एक ईश्वरी पुरुष आलेले आहेत. ते थोर विद्वान आहेत. तसेच ते सकलविद्यासंपन्न आहेत. अत्यंत आकर्षक व्यक्तिमत्वाचे हे दैवी पुरुष आध्यात्मिक सामर्थ्याचे आहेत. त्यांचे दर्शनाने मनःशांती लाभते. म्हणून आम्ही सर्वजण त्यांचे दर्शनार्थ जात असतो.

‘‘त्यांचे नाव काय?’’- राजे.

तसे त्यांना नावगाव नाही. यातीकुळ नाही. त्यांना नावाचा आग्रह नाही. लोक त्यांना श्रीचक्रधर किंवा द्वारावतीकार श्री चांगदेव राऊळ या नावाने संबोधितात.- पाल्हाडांगिया.

असे आहे तर मग त्यांचे दर्शनापासून आम्हास का वंचित ठेवता? त्यांचे दर्शनाचा आम्हांलाही लाभ घडवा ना ! -राजे.

राजाचे स्वामींचे दर्शनाला जाण्याचे ठरले. मुहूर्तही ठरला. दुसरेच दिवशी

निघणार होते. परंतु त्या दिवशी निघतानाच अंबारीचा हत्ती कोसळून खाली पडला व तात्काळ गतप्राण झाला. पुरोहितांनी सांगितले की हा अपशकून आहे. राजांनी जाऊ नये. तो दिवस टळला.

पुन्हा दुसरे दिवशी राजा महादेवराय यादव घोड्यावरून जाणार होता. ऐन वेळी अकाली पाऊस आला. सर्वजण दुर्गाचे आंत पळून गेले. तोही अपशकून झाला असे सांगून त्या दिवशी पुरोहितांनी राजाचे वेरूळ गमन रद्द केले.

परंतु राजास दर्शनास जाण्याची इच्छा होती. त्यामुळे त्यांनी वेरूळचा मार्ग गाड्या घोड्यांना योग्य होताच जाण्याचा निश्चय केला.

परंतु स्वामींचे भेटीला राजाने जाऊ नये म्हणून षड्यंत्र रचणाऱ्या लोकांच्या मनांत काही नवीनच योजना तयार होत गेल्या.

**ब्रह्मसानुचा विषप्रयोग**

स्वामींनी या काळात अचाट वेधशक्ती स्वीकारलेली होती. महादेव रायाचे राजसभेतील 'राजिके' वेरूळला येऊ लागलेले होते. राजे महादेवरावही आता येथे येणारच याची खात्री पटल्यावर ब्रह्मसानु आणि पैठणचे राजगुरू महदाश्रम तसेच चातुर्वर्ण्य व्यवस्थेचा कट्टर पुरस्कर्ता पंडित हेमाद्री हे लोक धास्तावते होते. राजाची स्वामींशी भेट झाली तर हे आपला मार्ग उच्छेदितील, हे आमच्या सनातन धर्माचाराचा नाश करतील ! अशी भीती हे लोक अनेकदा बोलून दाखवीत होते. ब्रह्मसानु ते रायाचे गुरू ते फुलंब्रीस राहत असत. त्यांनी तेथे स्वामींची प्रसिद्धी ऐकली होती. त्यामुळे ते देवगिरीस आले होते. तेथे त्यांनी पाहिले की देवगिरीचे अवघे लोक वेरूळला जाऊ लागले होते. हे पाहून त्यांनी म्हटले, "आता हे रायातेंही आदि करूनि वेधितीः 'उद्या राजा तिथे गेला तर यांचाच होईल. म्हणून त्यांनी चारी विषे मिळवून सुपारीच्या फोडी तयार केल्यात. त्या आपल्या शिष्यांचे हाती पाठविल्यात. त्यांना सांगितले की आधी त्यांची पूजा करावी. मग त्यांना फोडी द्याव्यात. मग तांबोळ द्यावे." त्या सूचनेप्रमाणे ब्रह्मसानुचा शिष्य वेरूळला आला. त्याने ब्रह्मसानुने सांगितल्याप्रमाणे स्वामींची पूजा केली. त्यानंतर सुपारीच्या फोडी त्यांचे हाती दिल्यात. त्या स्वामींनी हातात घेतल्या. दृष्टी भरून पाहिल्यात. दृष्टिपाते त्या निर्विष केल्यात. मग मुखात घातल्या. त्यांना विडा करून दिला तोही घेतला. एवढे करून ते शिष्य निघून गेले.

तीन दिवसांनी पुन्हा हा शिष्य वेरूळला गेला. तो परत आल्यावर ब्रह्मसानुस

सांगू लागला की आपल्या फोडी खाऊनही त्यांची मूर्ती जशीच्या तशीच आहे. त्यावर ब्रह्मसानुने शिष्यास विचारले की तुम्ही तिथे गेल्यावर काय काय केले? त्यांनी झालेला वृत्तांत सांगितला. त्यावर ब्रह्मसानु म्हणाले, "ते सामर्थ्यशील पुरुष आहेत. त्यांचे दृष्टीपुढे विष राहत नाही."

मग पुन्हा दुसरे शिष्यास म्हणाले, "आता तुम्ही जावे. त्यांचे आसन अंधारात रचावे. जेथे त्यांची दृष्टी या सुपारीचे फोडीवर पडणार नाही असे ते स्थान अंधारात असावे. मग तेथे पूजा करावी. आपुल्या हाताने फोडी त्यांचे तोंडात घालाव्यात त्याप्रमाणे ते शिष्य आले. त्यांनी ब्रह्मसानुने सांगितल्याप्रमाणे सर्व केले. अंधारात आसन रचले. तेथे स्वामींचे पूजन केले. आपले हातानेच त्यांचे तोंडात विषाक्त सुपारीच्या फोडी घातल्या. त्यांची दृष्टी त्यावर पडणार नाही याची पूर्णपणे काळजी घेतली. स्वामींनी हे सर्व काहीही अडथळा न करता स्वीकारले. त्यानंतर स्वामी त्या शिष्याला म्हणाले, "आता तुमचे कार्य झाले : आता तुम्ही जा :"

त्यावर त्या शिष्याची मनोमन प्रतिक्रिया चरित्रकाराने अशी नोंदविलेली आहे.

"ऐया रे : पुरुषी जाणितले :" तो वरमला व निघून गेला.

थोड्याच वेळात स्वामींचे कपाळावर स्वेदबिंदु आलेत.क्षणभर श्रीमूर्ति घामेजिली, श्रीमूर्तीस ताप आल्याचेही जाणविले : स्वामी बाईसांना म्हणतात, "बाई भांडे आणा."

भांडे आणल्यावर स्वामींनी त्या विषाक्त सुपारीची वांती केली. बाईसांना स्वामी म्हणाले, "बाई हे एकी ठाई पुरा : ती संपूर्ण वांती हिरवी-हिरवी होती. बाईसांनी ती हिरवी वांती एकांतात नेऊन पुरली.

तिसऱ्या वांतीतील तांबूळातील एक सुपारीची फोड स्वामींनी हातात धरली होती. ती काढून स्वामींनी आपल्या आपदेव भट्ट नावाच्या शिष्यास खायला दिली. ती खाताच त्यांना ज्वर आला.

हा सर्व प्रकार पाहून बाईसा फार घाबरली. तिने स्वामींना विचारले, हे काय बाबा?

स्वामी किंचित स्मित हास्य करीत म्हणाले, "यात हलाहत, काळकुट, रगतसिंगी, बचुनाग ही चार विषे मिसळलेली आहेत. या परस्पर विरूद्धधर्मी विषातील एकावर उपाय केला तर उरलेले तीन वाढीस लागतात. दुसऱ्यावर केला

तर उर्वीरत वाढतात.

त्यावर चिंताक्रांत बाईसा म्हणाल्या, ''आता काई करावे बाबा?'' ''भेओ नको बाई! आता आम्हांस काहीही होणार नाही. ही तर सुरूवात आहे. अजून खांबीपूजा ते व्हायची आहे. आम्ही तसे संपणार नाही. एकाला निमित्त करून मग निघून जाऊ. एक प्राणी बहुत दिवसापासून जाचत आहे. जळत आहे. त्याचा प्रयत्न काय वाया जावा? त्याचा मनोधर्म आम्ही स्वीकारला. त्याचे इच्छेला आम्ही मान दिला. म्हणून हे स्वीकारले आहे बाई!

बाईसा खूप घाबरली होती. दुःखी झाली होती. असहाय दुःखी मनाने ती पुन्हा विचारते,

''आता काय करावे बाबा?

बाई ! एथ करावे ते न लगे :''

हे ऐकून बाईसा फारच भीतिग्रस्त झाली. त्यावर स्वामी म्हणाले, ''बाई! आम्हांस तीन दिवस एकांतात राहू द्यावे. मग सर्व ठीक होईल.

स्वामींना मल्हार वसईत तीन दिवस तीन रात्र एकांतवासात ठेवण्यात आले. त्यावेळी स्वामींचे डोळे म्लान झाले होते. सर्वांगावर पांढरे फोड आले होते. त्यावर बाईसा म्हणाल्या,

''बाबा : आता काई करू?

दुधात सोजी करून द्या ! स्वामींना तीनही दिवस सोजीच देण्यात आली.तीन दिवसानंतर स्वामी पुनश्च जसेच्या तसे दैदिप्यामान कांतीचे होऊन बाहेर आलेत. मग नेहमीच्या मठात राहायला गेले.

**स्वामी आतंकित झाले नाही. विचलित झाले नाही.**

स्वामींना संपविण्यासाठी दोनदा विषाक्त सुपारी तोंडात घालण्याची मनीषा धरून आलेल्यांची मनःकामना स्वामींनी पूर्ण केली. आपल्या जीवावर उठलेल्या वैऱ्याला वैरी न मानण्याची, त्याचे मनोधर्म जाणूनही ते पुरविण्याची अलौकिक कृती करणाऱ्या स्वामींना कोणती उपमा द्यावी? ते निर्वैर होते. समत्व बुद्धीचे स्थितप्रज्ञ होते, हेच या घटनेवरून स्पष्ट होते.

स्वामी या नृशंस दुष्टांच्या दुष्कृत्यांनी थोडेही विचलित झालेले नव्हते. हेच त्यांचे दैनंदिनीवरून दिसून येते. याही अवस्थेत मानवी जीवनाच्या कल्याणाचे तत्त्वज्ञान आणि उपदेश करण्यातच त्यांचा वेळ जात होता. दोनदा विषप्रयोग

करणाऱ्या दुष्ट जनांचे पुढचे कारस्थानाची कल्पना असूनही स्वामी अत्यंत अविचल वृत्तीने वेरूळच्या लेण्यात राहत होते. त्यांचे दर्शनार्थ येणारांची संख्या दिवसेंदिवस वाढतच होती. स्वामींचा उपदेश सुरूच होता.

**चांगदेव भट्टास स्मरणाचे माहात्म्य सांगितले.**

स्वामींचा एक सर्वात लहान शिष्य होता चांगदेव भट्ट! त्याचे गावच्या महाजनांनी स्वामीजवळ येऊन विनंती केली की या मुलास गावास नेण्याची परवानगी द्यावी. कारण त्याची आई चिंताग्रस्त होती. स्वामींनी त्या मुलास जाण्याची अनुज्ञा दिली. चांगदेव भट्टास जाता-जाता त्यांनी उपदेशही केला. तो स्मरणीय आहे. स्वामी म्हणाले,

''बाळ : आम्हांस तुम्ही आठवित जा :

त्यावर चांगदेव भट्ट म्हणाले,'म्हणजे कसे?'

स्वामी म्हणाले,''आमचे नावाचे स्मरण करीत जा : दहावीस वेळ आठवीत जा. दहावीस वेळा नाही तरी सातपाच वेळा तरी आठवावे. सातपाच वेळ नाही तरी दोनचार वेळ तरी आठवीत जा : दोनचार वेळ नाही तरी एकदोन वेळा तरी आठवावे हो. दिवस वंझ्य न जाऊ द्यावा! आठवावे.''

स्वामींनी यावर एक दृष्टांत सांगितला. तो संस्मरणीय आहे. ते म्हणाले,''एक भिंगुरटी असते. ती कीटकाकडे पाहते. तिला ती धरते. तिला काटा रोवते. मग तिला आपले घरात नेऊन ठेवते. दार बंद करून जाते. त्या कीटकीला भिंगुरटी एवढेच पंख फुटतात. ती तिच्यासारखीच होते. तसेच तुम्ही माझे स्मरण करीत राहाल तर तुम्ही आमचेसारखेच व्हाल. तैसे ईश्वराचेया योगात ईश्वरातें चिंतीत चिंतीतां भक्त ईश्वरासारखाच होयः''

हा ईश्वरस्मरणाचा पाठ सदासर्वदा भक्तगणासाठी उपयोगाचा आहे. तो त्यांनी दिला त्यावेळी त्यांना विषप्रयोगाची चिंता उरली नव्हती. ते त्याही अवस्थेत निश्चल, अविचल, निर्भय होते. त्यांची ती अवस्था स्थितप्रज्ञाची होती. वैऱ्याची इच्छा स्पष्टपणे दुष्टाव्याची आहे, हे दिसूनही त्यांनी ती इच्छा पूर्ण करण्याचे जगावेगळे औदार्य आणि धैर्य दाखविले. ते अपूर्व होते. ते मानवी इतिहासात अभावानेच आढळणारे असल्यामुळे त्यांना जगावेगळा महान पुरुषश्रेष्ठ मानणे भाग पडते, आणि अशा व्यक्तिमत्वासमोर नतमस्तक होऊन शरणागत व्हावेसे वाटते. अशांचे रूप आणि गुणांचे स्मरण करीत गेले तर आपणही त्यांच्यासमान होण्याची संधी

प्राप्त होते. म्हणून या सकलगुणसंपन्न सर्वज्ञ श्रीचक्रधरांचे स्मरण हे मानवी जीवांना तारक आहे, असे जाणवते.

**नाथोबांचे टीळा जाणीवे**

स्वामीच्या परिवारातील एक होते नाथोबा! स्वामी त्यांना म्हणाले, '' नाथोबा तुम्ही टीळा का लावता? जाणिवे का घालता?''

नाथोबा म्हणाले, ''भीक्षा यावया कारणे.'' स्वामी म्हणाले, ''तुम्हास टीळा जाणिव्याशिवाय भीक्षा येणार नाही का? पाहू आज टीळा आणि जाणिव्याशिवाय भिक्षा येईल की नाही ते पाहून या बरे!

नाथोबा म्हणाले, ''मग हे टीळा जाणिवे काय करू?

स्वामी-''ते जमिनीत पूरा अन् तेथेची तिसऱ्या प्रहारापर्यंत बसा.''

नाथोबांनी जाणिवे आणि टीळा जमिनीत पुरले व तेथे बसले. परंतु काही वेळ बसल्यावर ते उठले आणि काही दूर चालत गेले. पुन्हा बसले. पुन्हा उठले. काही अंतर गेले. शेवटी त्यांनी बराच वेळ वाट पाहूनही कुणी भिक्षा घेऊन आले नाही म्हणून अधीर होऊन पुरलेला टीळा आणि जाणिवे काढले. टीळा लावला आणि जाणिवे घातले.तितक्यात एक ब्राह्मण देवतेस नैवेद्य घेऊन आला. तो म्हणाला, तुम्ही थांबा मी हा नैवेद्य दाखवून तुम्हास भिक्षा देतो. नाथोबांना वाटले की आपण क्षणभर थांबलो असतो तर ही भिक्षा मिळाली असतीच. अधीर होऊन टीळा जाणिवे काढायला नको होते. हे सर्व त्याने स्वामींना सांगितले आणि पुढे म्हटले की, ''मला भिक्षेचा विधी सांगावा जी!''

स्वामींनी त्यांना सांगितले की हे टीळा जाणिवे सोडा.'चातुर्वर्ण्यात् चरेत् भिक्षम्' या शास्त्रानुसार भिक्षा करा. घर न निवडीता भिक्षा करावी. ओळखीच्या घरी भिक्षा न करावी. गावात एकीकडून प्रवेश करावा व दुसरीकडून निघावे नगरात शिरा आणि तुमचे पात्रात आले तेच मिळवा. इतर पदार्थांची अभिलाषा ठेवू नका. अशी भिक्षा मागा.' त्यावर नाथोबा म्हणाले,'आपविजता न मिळे तर काई?' स्वामी गमतीने व्यंग करीत म्हणाले, ''मग खुंट गिळावे.'' उपवाशी राहावे.

**राजा येत आहे तेव्हा प्रयाण**

एकदा राजा महादेवरावांचा हत्ती मेला म्हणून तो येऊ शकला नाही. दुसरे दिवशी पाऊस पडला म्हणून राजाचे आगमन झाले नाही. यात झालेल्या कालापव्ययात स्वामींवर विष प्रयोग झाले. तरीही स्वामींनी वेरूळ सोडले नव्हते

त्यांचे दर्शनार्थी वाढतच होते. त्यांचे कीर्तीचा सुगंध पसरतच होता. त्या सुगंधाचे आकर्षणाने राजे महादेवरावांनी ठरविले की आता सकाळी जायचेच. ते म्हणाले, ''आजि राज्य जाओ : अथवा राहो : परि मी गोसावियांचीया दरीसनासि जाइनचि :''

राजाची स्वारी सकाळी निघाली होती. त्यावेळी स्वामींना ते जाणवले व स्वामींनी बाईना सांगितले की 'राजा येत आहे.' बाईसांना आनंद झाला होता. ती म्हणाली, ''येते तर येऊ द्या की.'' ''राहील तर राहू द्या.'' स्वामी म्हणाले, ''मग तुम्ही कुठे राहाल?' बाई राजा येथे दिवस काढील. आपले सामान आवरा. आता आपण येथून निघायला हवे. त्याप्रमाणे सर्वजण माटखेड्याकडे निघून गेले.

राजा आला आणि त्याने सर्व लेण्यात धुंडाळून पाहिले परंतु स्वामी दिसले नाहीत. राजे खिन्न होऊन परत फिरले.

स्वामींना भेटण्याची उत्कट इच्छा असूनही राजांना दर्शन झाले नाही. ते झाले असते तर ते विषाक्त सुपारी देणाऱ्यांचे मन अधिकच पोळले असते. त्यातून संघर्ष वाढला असता. तो वाढू नये या हेतूनेच स्वामींनी वेरूळ सोडले होते. संघर्षाला पाठ देऊन स्वामी आपल्या वाटेने निघून गेले होते.

### महदाईसा आणि नागदेवाचार्य

आबाईसा नावाच्या बाईचा मोठा मुलगा सारंगपाणी भिक्षाटनासाठी दूर गेला होता. तो वाटेत चोरांच्या तावडीत सापडला व मारल्या गेला. त्या दुःखामुळे आबाईसांनी क्षेत्रसंन्यास घेतला. ती रावसगावला मठी बांधून राहू लागली. तिचेसह तिची मुलगी उमाईसा होती. पुतणी महदाईसा होती. तेथे त्या मासोपवास करीत राहत असत. तेथे रामदेव दादोस आलेत.त्यांचेकडून या बायांनी श्रीचक्रधर स्वामींची कीर्ति ऐकली व त्यामुळे त्या स्वामींचे दर्शनासाठी उत्सुक झाल्या. त्यांचे सोबत आबाईसाचा मधला मुलगा नागदेव हाही दादोसांचा शिष्य झाला होता. हे सर्व श्रीचक्रधर स्वामींच्या दर्शनासाठी निघाले. स्वामी श्रीनगर (सिन्नर) येथे होते. तेथे स्वामींचे दर्शनार्थ आबाईसा, महदाईसा, उमाईसा, येल्हमभट आणि नागदेवाचार्य हे सर्व दादोसांचे सोबत आले.

स्वामींचे दर्शनानंतर नागदेवाचार्य आणि महदाईसा स्वामींचे परिवारात सामील झाले.

**धन नाही प्रेम मागा : सोने नाही देव मागा**

स्वामी कनाशीला गेले होते. तेथे एका ब्राह्मणाने स्वामींना नगरात आपले घरी नेले. चांगले स्वागत केले. सोबत दादोस, नागदेवाचार्य, महदाईसा,बाईसा आदि शिष्यगण होते. एके दिवशी सकाळी तो ब्राह्मण स्वामींना गावाबाहेर पोहचवायला निघाला. तेव्हा स्वामी त्याला म्हणाले,''भट्टो! काही मागा!''

''जी : जी : मज कोठेया कोनी : सुनाचेन हाते : ताक आंबील देयावी जी :''- ब्राह्मणाचे हे मागणे फार चतुराईचे होते. त्याने या वाक्यात अनेक गोष्टी मागितल्या होत्या. त्याला मागायचे होते की म्हातारा होईपर्यंत जगू द्या. म्हातारपणात कोठ्यात म्हाताऱ्याची बाज टाकतात. तेथे माझ्या सुनांचे हाताने ताकभात जेवण्याचे भाग्य द्या.म्हणजे मला मुलं होऊ द्या. त्यांची लग्ने पाहू द्या. त्यांच्या बायकांचे हातून मला ताकभात जेवण्याइतपत दीर्घायुष्य लाभू द्या. हा वर तसा मोठाच होता. परंतु त्यावर स्वामी म्हणाले,-

''भट्टो! हे सर्व कर्मवसे होणारच आहे. अजून काही मागा :'' परंतु ब्राह्मण म्हणाला,''मला हेची द्यावे जीः'' त्यावर स्वामींनी एक दृष्टांत सांगितला. ते म्हणाले, ''एक साळी(कोष्टी) होता. तो बाजारात गेला आणि सर्व बाजारात त्याला हवी ती खरेदी करून वस्त्र विणायच्या मागासाठी धोटा पाहू लागला. धोट्यालाच 'वेव' असेही म्हणत. खूप धुंडाळून बाजारात वेव मिळाले नाही. तो परत गावास निघाला.

रस्त्यात एका झाडाचे शीतल छायेत तो विसावला. वृक्ष डेरेदार होता. पडल्या-पडल्या त्याने त्या वृक्षाकडे पाहिले. त्याचे असे लक्षात आले की वृक्षाच्या लहान लहान फांद्या अतिशय सरळ आहेत. या फांद्यांचे 'वेव' किंवा धोटे बनविले तर ते उत्तम होतील. या फांद्यांचे वेव मिळाले तर किती छान होईल.अशी त्यांनी मनोमन कामना केली आणि आश्चर्य हे की त्या वृक्षावरून वेवच पडू लागले. कोष्टी आनंदून म्हणाला, छान झाले. जे बाजारात मिळाले नाही, ते येथे मिळाले.

स्वामी म्हणतात,''तो वृक्ष कल्पवृक्ष होता. या माणसाने जे मागितले असते ते देण्याची त्याची क्षमता होती. खूप काही मूल्यवान गोष्टी मागता आल्या असत्या. परंतु त्याने 'वेवच' मागितले. ते तुम्ही जे सामान्यपणे घडावे, कर्मवसे व्हावे, तेच मागता आहात. तुमचे समोर ईश्वर प्रसन्न होऊन उभा राहिला तर तुम्ही काय हेच मागाल?तुम्ही निरतिशय निरंतर टिकणारे ईश्वराचे प्रेम मागावे भट्टो!''

स्वामींचा हा मोलाचा उपदेश लक्षांत घेऊन त्या भाग्यवंत ब्राह्मणाने स्वामींना प्रेमभराने निरोप दिला. त्याची ती प्रेमाची शिदोरी घेऊन तो ब्राह्मण आपल्या नगराकडे परतला. असे अनेक गावी अनेक लोक स्वामींच्या प्रेमाने भारावून उपकृत होऊन जात होते. ही प्रेमदानाची महायात्रा अखंड सुरू होती. एका गावावरून दुसऱ्या गावी स्वामींची ही प्रेमयात्रा सुरू असताना अनेक प्रकाराच्या लक्षणीय घटना घडत होत्या.

## भिक्षान्नाची कामधेनू

एका गावाचे बाहेर वडाची खूप मोठी शीतल छाया होती. त्या वडातळी स्वामींचा परिवार थांबला होता. त्या गावात भिक्षा मागायला म्हणून बाईसा, महदाईसा गेली. इतर शिष्यगणही गेले होते. गावात एका ब्राह्मणाच्या घरी मौंजीबंधन झाले होते. त्या घरी बाईसा आणि महदाईसा यांना वडे, मांडे, घारीया, पुरीया, लाडू, तिळवे,अमृतफळे, सेवैया, सरवळी, साकवती हे पदार्थ भिक्षेत मिळाले. त्या ब्राह्मणाचे घरी काही पदार्थ तयार होते. तर काही त्यांनी या भिक्षेकरी बायासाठी आणि स्वामींसाठी मुद्दाम रांधून दिले होते.

ते सर्व घेऊन बाईसा आणि महदाईसा येत होत्या. त्यांचेकडे पाहून स्वामी म्हणाले, "आलीया गा येथीचिया कामधेनु." सर्वांनी ते सुग्रास अन्न ग्रहण केले. कधी असे प्रसंग येत तर कधी भिक्षान्नात शिळेपाते कोरके कोरडे अन्नही येत असे. तेव्हा स्वामी म्हणत,

"भिक्षा राज्य की बाई :" "कदन्न येवो, थंड येवो की उष्ण सर्व कुस्करून हे प्रसादवत भिक्षान्न आनंदाने ग्रहण करावे. ही स्वामींची शिकवण होती. या शिकवणीनुसार आचार करायला या सहयात्रींना शिकवून तयार करण्याचे कार्य स्वामी करीत होते. त्यातून एक नवा आचार धर्म उदित होत होता.

## वसयीत निवास

वसयी ही जैन मुनींची निवासाची जागा. भडगाव येथील वसयीत एकदा स्वामी सहयात्रींसह गेले. तेथे थांबले. सोबत इंद्रभट्ट होते. त्यांना स्वामी म्हणतात, "भटो! हत्ती अंगावर चालून आला. त्याचे पायाखाली चेंगरून मरण्याचे कठीण संकट आले तरी ब्राह्मणाने वसयीचा आश्रय घेऊ नये, असे तुमचे शास्त्र सांगते." मग तुम्ही येथे कसे आलात?-स्वामी.

इंद्रभट म्हणाले, "आम्ही आमच्या पूज्य गोसीवियांचे सोबत आलोत."

स्वामी त्यावर म्हणतात, ''अनेक अवतारातील ही एक देवता होय, हे बरोबर आहे नां?''

'होय बाबा!'- इंद्रभट.

भट्टाचार्यांनी आपल्या अभिमानासाठी नव्हे आपले दुरभिमानासाठी १८ जैन साधूंना वादात हरवून उकळत्या तेलाच्या कढईत टाकले. त्याने या देवतेला दुखविले. तुम्हांला मात्र वसयी वर्ज्य केली. 'ऐसा या भट्टाचार्य', आपुलेनी अभिमाने देवता दुखीली: वैरियाचा देव जाला तरी काय दगडे हाणून फोडावा? देवतेचा निषेध करावा काय?'' त्यावर इंद्रभट रागातच म्हणाले, 'जी : जी : तो भट्टाचार्य नव्हे : तो सुना : तेऊते तेऊते भुंकतची गेला.''

शेजारी महदाईसा बसलेली होती. ती पुराण कथा आणि धर्माचा इतिहास जाणत होती. ती म्हणाली, ''जी : जी : भट्टचार्यांनी एवढा अभिमान का धरला होता?

बाई त्यांना वेदांतीचे यथावत कर्मज्ञान होते. कर्मकांडाचे त्यांचे वेदोक्त ज्ञान त्यांना होते. याचा त्यांना अभिमान होता.

मग त्या भट्टाचार्याने देवतेचा इतका निषेध केला. त्यावर माझा प्रश्न असा की वादात हरले म्हणजे संपले, सरले असे समजून १८ क्षेपणिकांना उकळत्या तेलाच्या कढईत घालून त्यांचा निर्घृण अंत केला. ती अपरिमित हिंसा झाली, असे त्यांना वाटले नसेल का? याची त्यांना जाणीव नसेल का?

यावर स्वामी म्हणाले,

बाई पोर जीव आपले बरे-वाईट सर्व जाणते, परी जाणून बुजून करीत असते. ते त्यांनी जाणूनच केले होते. त्यामुळे तो तत्काळ नरकास गेला.अशा जाणत्यापेक्षा नेणता बरा. जसा ओलेयापेक्षा कोरडा चांगला असतो. अज्ञानाने घडलेल्या हिंसेपेक्षा जाणीवपूर्वक घडलेली हिंसा भयंकर दोषार्ह असते. ते भयंकर पाप असते.

महदाईसानी पुन्हा प्रश्न विचारला की, ''बाबा आपण म्हणाला की जाणौनीची ओखटे करी ते कैसे?

त्यावर स्वामी म्हणतात, ''त्या जैन मुनींनी वेदातले सार काढूनच, त्या आधारेच आपला जैन मार्ग प्रतिष्ठिला होता ना? वेदवाङ्मयाधारेच वेद मार्ग अप्रतिष्ठित केला होता ना? कर्म मार्ग खंडित केला होता ना? त्यावरच भट्टाचार्य

आणि जैन मुनींचा वादविवाद सुरू झाला होता. जैन म्हणाले, तुम्हांस आम्ही निरूतर केले तर तुम्ही काय कराल? आमचा मार्ग अनुसरून आम्हांस गुरू मानावे! भट्टाचार्य म्हणाले, "प्रणुं करा." तुम्हांस आम्ही निरुत्तर केले तर तुम्ही काय कराल?

"तुम्ही म्हणाल ते करू!"-जैनमुनी.

हो कां? मग तुम्हांस तैल तप्त कढईत जावे लागेल.

मग राजाच्या समोर वादविवाद सुरू झाला. त्यात प्रथम भट्टाचार्यांचा पराभव झाला. त्यांनी ठरल्याप्रमाणे जैनांचा उपदेश घेतला. त्यांना गुरू केले. ते शिष्यासारखे वागू लागले. जैनांच्या शास्त्राचा अभ्यास करता त्यांचे असे लक्षात आले की यात वेदाच्या वेगळे असे काहीच नाही. मग भट्टाचार्यानी ज्वर आला असे भासविले. जैन मुनींना नमस्कार करायला जाणे बंद झाले. ते आपले बिढारावरच पडून राहिले. त्यांचे शिष्य मात्र जैनमुनींच्या दर्शनास जात. जैनमुनींनी शिष्यांना विचारले, "तुमचे सोबत भट्टाचार्य दिसत नाहीत, ते कां?" शिष्य म्हणाले, त्यांना थोडा ताप आहे. ते अस्वस्थ आहेत."

पांच सात दिवस निघून गेले. भट्टाचार्यांनी शिष्यांना सांगितले की आता क्षेपणिकांना असे सांगा की, आजी आचार्य निवर्तले : तरि काई कर्तव्य ते सांगा! जैन मुनींनी आपले मुख्य गुरूस विचारून सांगितले की, 'तुम्ही तुमची वैदिक क्रिया करा.'

हे भट्टाचार्यांना सांगितले. भट्टाचार्यांना आनंद झाला. ते क्षेपणिकांकडे आले आणि म्हणाले, "तुम्ही म्हणाले होते की वेद लटका आहे. त्यातील कर्मकांड ते लटके आहे. परंतु तुम्ही आज वैदिक क्रिया करा असे सांगितले. मग आमचा वेद कसा लटका? वेद सत्य आहे. त्यातले कर्मकांड सत्य आहे. हे, 'वैदिक क्रिया करा' हे सांगितल्यामुळे सिद्ध होते. तुम्ही प्रण केल्या प्रमाणे आता तुम्ही उकळत्या तेलाचे कढईत शिरा. मग राजा समक्ष अठरा क्षेपणिक उकळत्या तेलाचे कढईत टाकले.

परंतु हा भट्टाचार्य स्वतः जाणत होता की यामुळे त्यांनी ज्यांना गुरू मानिले होते, त्यांना उकळत्या तेलाचे कढईत जाळल्या-मारल्यामुळे गुरू द्रोह घडला. याला प्रायश्चित्त काय? ते त्यांनी आपले शास्त्रात पाहिले.त्यात असे लिहिले होते की यास 'गोरांजन' हे प्रायश्चित्त आहे. त्यामुळे त्यांनी अडीच हात उंचीची गोवऱ्याची

एक बौली तयार केली. त्यात ते बसले. त्यांचे प्रायश्चिताचे विधी प्रमाणे आंगठा पेटवून घेतला. त्या गोवऱ्यांचेसह कर्पत-कर्पत शरीर जाळून प्रायश्चित करून घेतले.त्यावर स्वामी म्हणाले, ''भट्टाचार्य असे जाणत होते की अमुक कर्मास अमुक पाप होते. त्यास अमुक-अमुक प्रायश्चित आहे. असे पूर्वमीमांसेचे यथायोग्य ज्ञान ते जाणत होते. तरीही स्वतःची आणि इतरेजनांची अशा दोन्ही हिंसा घडल्या. हे जाणूनच करणे झाले. म्हणून जाणत्यापेक्षा अजाणता चांगला.

स्वामींचे हे उद्‌बोधक कथाकथन महदाईसांना नवे नव्हते. इतरही सहयात्रिकांना माहिती होते. इंद्रभट्टांनाही माहिती होते. सर्व ब्राह्मण शिष्यवर्गाने ऐकलेले वास्तव होते. परंतु ते अठरा क्षेपणिकांना हरविल्यामुळे भट्टाचार्यांच्या बौद्धिक पराक्रमाचे वर्णन म्हणून ऐकलेले होते. त्यांचे ते अक्षम्य पापकर्म होते. हे ऐकणे दुःसह असणारे वृथा धर्माभिमानीही तिथे असतील. हे वास्तव ऐकविणे हे तेथील काही दुरभिमानी भक्तांच्या दृष्टीने महान दुष्कर्म होते. हे कानोकानी महदाश्रम, ब्रह्मसानु आणि हेमाद्रीसारख्या कट्टर धर्माभिमानी लोकांच्या कानावर गेले असेलच. ही कहाणी, ही ऐतिहासिक नोंद, आजही सांगितली तरी आजच्याही सनातनी मानसिकतेच्या धर्माभिमानी लोकांची मने दुखावतील. त्या काळातल्या धर्माच्या दुरभिमानी लोकांची दुखावलेली मने किती क्षुब्ध झाली असतील याची कल्पनाच केलेली बरी. या क्षुब्ध मानसिकतेच्या लोकांनी स्वामींच्या संयमाची तर परीक्षा पाहिलीच होती.परंतु त्याच बरोबर त्यांच्या विद्वत्ता आणि आध्यात्मिक सामर्थ्याचीही कसोटी पाहण्याचा प्रयत्न केलेला होता. त्यांची प्रतिक्रिया स्वाभाविकच 'हे आमचा मार्ग उच्छेदीती' अशीच झाली असणार. सनातन मार्गाभिमानी लोकांच्या अशाच प्रतिक्रिया उमटाव्या अशाच घटना स्वामीच्या या पदयात्रेत घडत होत्या. त्या दृष्टीने ही महाराष्ट्रभर निघालेली प्रबोधन पदयात्रा गाजत होती.

## दाकोबाची जाडी : परंपरा तोडी

एकदा स्वामी मंदिरात बसलेले होते. सराळ्याचे महाजन-ब्राह्मण स्वामींची पूजा करीत होते. इतक्यात चांभार गोंद्याचा खाती आला. त्याचे नाव दाकोबा असे होते. त्यांनी स्वामींसाठी जाडी व चवरी आणलेली होती. ती भेट देऊन स्वामींचे दर्शन घेण्यासाठी तो आला होता. परंतु तो मंदिरात प्रवेश करू शकत नव्हता. वर्णाश्रम धर्माला स्पृश्यास्पृश्यतेची कटु फळे आलेली होती. ती या

काळात अधिकच कडवट झालेली होती. ज्यांनी समाजाची सेवा करावी ते सर्व वरिष्ठ वर्णीयांसाठी अस्पृश्य होते. त्यांना मंदिरात प्रवेश नव्हता. देवळातील देवाचे दर्शन करण्याचा त्यांना अधिकार नव्हता. त्यामुळे दाकोबा मंदिराबाहेर थांबले. एक शिष्य बाहेर आला. तेव्हा दाकोबाने त्या शिष्याला सांगितले की, ''स्वामींना सांगा की बाहेर दाकोबा आला आहे.आपले दर्शनासाठी थांबला आहे.''

स्वामींना हा निरोप कळला. निरोप कळताच त्यांना बाहेर निघायचे होते. परंतु सराळेकर ब्राह्मण-महाजनांची पूजा संपत नव्हती. महाजनांची पूजा संपण्याची वाट पाहण्यात काही वेळ गेला. शेवटी स्वामी उठले आणि बाहेर आले.

दाकोबानी स्वामींना भक्तिभावाने साष्टांग दंडवत करून श्री चरणावर लोटांगण घातले आणि हातातील चवरी स्वामींना भेट म्हणून दिली. 'पांचवणी जाडी' स्वामींचे हातात देताना तो म्हणाला, ''जी : जी : स्वामी जगन्नाथा! ही जाडी भरडी जाडी तुमचे करिता आणली खरी परंतु ती तुमचे कोमल अंगावर रुतेल हो!''

त्यावर स्वामी म्हणाले, ''हे पहा मंदिराचे आंत बरेच काटेरी गोनटे आहेत. ती आत-बाहेर विकल्पांच्या काट्यांनी मढवलेली 'दाभणाची गोनटी' पाहा. त्यापेक्षा ही तुझी जाडी प्रेम आणि भक्तीच्या रेशमी धाग्यांनी नाजूक आणि नरम झालेली आहे. चल ये आंत तुला ती काटेरी दाभणाची गोनटी दाखवितो.

स्वामी त्या अस्पृश्य दाकोबाला आपल्या मंदिरात घेऊन जातात. त्यांना पाय धुण्यास पाणी देववितात. स्वामीजवळ असणाऱ्या ब्राह्मण शिष्याकरवी दाकोबाचे पाय धुववून घेणे ही क्रिया त्या काळात विपरीतच होती. लोकाचाराविरूध्द होती.

त्याहून पुढे जाऊन स्वामी दाकोबाला आपल्या पंगतीत, आपल्या नजरेसमोर मंदिराचे पट्टीशाळेत सहभोजनाला.घेऊन बसतात. भोजनोत्तर त्याला विडा देववितात. असा हा अस्पृश्य पाहुणा राजमठात वा मंदिरात सन्मानपूर्वक येतो, सहभोजन करतो. तांबूळ आणि विडा देऊन त्याचा सन्मान होतो. हे त्या काळी विपरीतच घडले होते. चातुर्वर्ण्यव्यवस्थेत आलेली विकृती दूर करण्याचा स्वामींचा हा प्रयत्न स्तुत्य असला तरी तो लोकांविरूद्ध होता. तोही सराळ्याचे सदर्थ ब्राह्मण महाजनांच्या समक्ष झालेला होता. त्या ब्राह्मण भक्तांनी स्वामींच्या आध्यात्मिक प्रभावामुळे व स्वामीवरीत त्यांचे भक्तीमुळे हा दुःसह प्रकार चालवून

घेतलाही असेल परंतु अशा विपरीत आणि लोकाविरूद्ध घटनेची वार्ता सर्वत्र पसरल्यावर वरिष्ठ वर्णीयांचे कट्टर अभिमानी महाजनांना ती घटना धर्मबाह्य वाटली असणारच. ती त्याकाळी दंडनीय अपराधात मोडणारी घटना, चातुर्वर्ण्यव्यवस्थेची चौकट कायम टिकविण्याचे कार्य करणाऱ्या 'हेमाद्री, ब्रह्मसानु आणि महदाश्रमासारख्या पंडितांना रुचणे शक्यच नव्हते. म्हणूनच त्यांचे तोंडून 'हे आमचा धर्म उच्छेदीती' हा स्वाभाविक उद्‌गार सतत निघत होता. अशाच मानसिकतेतून स्वामींना दोनदा विषाक्त सुपारीचा 'प्रसाद' चारण्यात आलेला होता, हे उघड आहे.

**भूतदयेचा आगळा आदर्श**

स्वामी डोमेग्रामला होते. तेथे एक मोठा सांड होता. तो इतका दांडगाई करायचा की त्याचा गावातल्या लोकांना खूप त्रास होता. गावातील शेती खाऊन फस्त करायचा. अशा या उपद्रवी सांडाची कायमची व्यवस्था लावायची म्हणून गावकऱ्यांनी एकत्र येऊन युक्तिप्रयुक्तीने त्याला जाळ्यात पकडले अन दोरखंडाने त्याच्या पायात खुराजवळ घट्ट बांधून जखडून टाकले, त्याला मोकळे चालता येत नसे. तो नदी काठी असूनही तीन दिवसांपासून पाण्याविना तडफडत होता. हळूहळू पाण्याकडे पाहत सरकत होता.ही क्रूर शिक्षा भोगणाऱ्या या मुक्या प्राण्यास तडफडत मरण्याशिवाय दुसरा उपाय नव्हता. त्याच्या तोंडात तीन दिवसांपासून घास गेलेला नव्हता. त्याचे तडफडणे पाहून स्वामींच्यासोबत असणाऱ्या संतप्रकृतीच्या भक्तगणांना दया आली. ते स्वामींना म्हणालेत,''जी : जी : याच्या खुरीचे दोरखंडे तोडू? स्वामी मौन राहिले. पुन्हा भक्तगण म्हणाले,''बापुडा वसो खुरी अडला असे जी! त्याचे खुरीचे बंध मासात घुसले आहेत. या बापड्यास देहपात होत आहे. याचे बंध तोडू?''

त्यावर मौन तोडून स्वामी म्हणाले, याची पूर्वकर्मे आम्ही जाणतो. त्यावर स्वामींनी एक दृष्टांत सांगितला.ते म्हणाले,''एका गावात एक माळी होता. त्याच्या मळ्याशेजारी एक चोर लपून बसायचा. त्या वाटेने जाणाऱ्या वाटसरूंना लुटायचा, मारायचा. त्यांचे खून पाडायचा. संन्याशांना मारी. ब्राह्मणांना मारी. सदर्थ मारी अन् गरिबांनाही मारी. मारल्यावर त्यांचे द्रव्य हारी. असा हा निर्दय क्रूर अन्यायी चोर एके दिवशी पकडल्या गेला आणि राजाने त्यास शिक्षा सुनावली. त्याला बैलासारखे घाण्यास जुंपले. तो पळून जाऊ नये म्हणून हातात हातकड्या घातल्या.

त्या धाण्याचे लाकडात फसविलेल्या होत्या.

गावातील लोक त्याला पाहायला जात. हा देखणा चोर गोरागोमटा होता.सुंदर राणीचा पुत्र शोभावा असा होता. अशा ह्या 'बापुड्याला' राजाने ही शिक्षा कां बरे दिली असेल? चांगल्या माणसाला अशी शिक्षा देणे अन्यायाचे आहे, असेच उद्‌गार पाहणाऱ्यांचे तोंडून निघत. परंतु तिथे तो माळी आलेला होता.तो म्हणाला, अरे हा भयंकर क्रूर चोर आहे. माझ्या शेताजवळच्या वाटेवर अनेकांना हा मारीत होता. सदर्थांना मारीत होता अन् दरिद्रांनाही मारीत होता. संन्यासी मारत होता अन् ब्राह्मणही मारीत होता. याला ही शिक्षा योग्यच आहे. तसे आम्ही सांडाचे पूर्वकर्म जाणतो. त्याला हे भोग भोगावेच लागणार होते. ते त्याच्या पूर्वकर्माचे क्षालनासाठी योग्यच आहे. आपल्या कर्माची फळे भोगावीच लागतात.

त्यावरही पुन्हा एक शिष्य काकुळतीने म्हणाला, "बिचारा वसो! मरतो आहे जी! याला याच्या कृतकर्माची पुरती शिक्षा मिळाली आहे. आता याला मुक्त करावे जी! महाराज याचे बंध तोडण्याची अनुज्ञा द्यावी!"

कृपाळू कनवाळू हृदयाच्या स्वामींनी अनुज्ञा दिली, परंतु ते म्हणाले हा वसो एवढा बलवान आहे की तो तुम्हांस आपले बंध तोडू द्यायचा नाही. त्याला गंगेतील पाण्यात जाऊ द्या म्हणजे तो बंध तोडू देईल.

थोड्या अवधीत तो पाण्यात गेला. त्याची तहान पूर्ण होईपर्यंत पाणी प्यायला. सर्व भक्त बंध तोडण्यास गेले. त्यानंतर नागदेव म्हणाले, "तुम्ही सर्वजण याला धरा, आम्ही याचे बंध कापू किंवा आम्ही एकटे धरू तुम्ही याचे बंध तोडा."

नागदेवाचार्यांनी वसोची शिंगे पकडून धरली आणि इतरांनी त्याची खुरे मोकळी केली. त्याच्या खुरात रुतलेले बंध मोकळे होताच खुरातून भळभळून रक्त वाहू लागले. सर्व भक्तगण स्वामींना सांगायला आले. त्याचे खुरातून वाहणाऱ्या रक्ताने नदीचा प्रवाह लाल लाल होऊ लागला होता.

इतक्यात तो वसो मागील थडीवरून पाण्याबाहेर आला व स्वामींच्या जवळ येऊन उभा राहिला. या बंधमुक्त करणाऱ्या स्वामींचे तो मुका प्राणी आभारच मानीत होता जणु! त्याला स्वामींची ओळख पटली होती. हा भूतदयेचा सागर आहे, हे त्याला कळले होते.

## डांगरेशाचे आत्मसमर्पण

एके दिवशी स्वामी उदास झालेले होते. ते आपल्या शिष्यांना म्हणाले, येथे

तुम्ही कशासाठी आहांत? या स्वामींच्या प्रश्नावर कुणीही योग्य उत्तर देऊ शकले नाही. त्यामुळे उदास होऊन स्वामी म्हणाले, "तुम्ही सर्व येथून जा." स्वामींची ही आज्ञा शिरसावंद्य मानून सर्वजण निघून गेले. परंतु तेथे स्वामीभक्त श्वास "डांगरेश" बसून राहिला. स्वामींनी त्याचेकडे पाहून म्हटले, "डांगरेशा तुम्हीही जा." हे शब्द ऐकून तो मुका प्राणी दुःखित झाला. परंतु स्वामींची आज्ञा पाळण्यासाठी तो उठला. स्वामींच्या पायावर नतमस्तक होऊन स्वामींना पांच प्रदक्षिणा करून पाणावलेल्या डोळ्यांनी तो निघून गेला.

सायंकाळी सर्व भक्त हळूहळू मंदिरात परत येऊ लागले होते. सर्व आलेले पाहून स्वामी म्हणाले, "डांगरेश दिसत नाहीत? तुम्ही सर्वजण आलात परंतु तो आलेला दिसत नाही, हे काय आहे?

"असेल पोट भरत!"-भक्त.

स्वामी म्हणाले, "तैसे नव्हे. जा शोध करा."

भक्तगण सर्व दिशांनी शोधायला गेले. एकजण सांगत आला की, "डांगरेशाने देह ठेविले."

स्वामींनी तेथे जाऊन पाहिले. डांगरेश हा मुका प्राणी स्वामींची आज्ञा पाळण्यासाठी मठातून निघाला होता. तो कायमचाच. स्वामींनी जा म्हटले तो कायमचा गेला होता. त्याने दलदलीच्या मातीत तोंड खुपसून स्वतःच स्वतःचा अंत करून घेतला होता. हे स्वामींच्या शब्दासाठी, स्वामींच्या आज्ञा पालनासाठी त्याने केलेले आत्मसमर्पण जगातील मुक्या प्राण्यांच्या इतिहासात आगळे वेगळे समर्पण म्हणून नोंदविल्या जावे असे आहे. हा डांगरेश स्वामींच्या चरित्रातील मूकनायक आहे. तो एक स्वतंत्र चरित्राचा विषय व्हावा असा आहे. स्वामींचे स्वामित्व मानणारा हा मुका प्राणी स्वामींच्या व्यक्तिमत्वातील दैवी सामर्थ्य ओळखणारा एक साक्षीदार होता. म्हणून स्वामी भक्तांना म्हणाले, 'तुम्हा परीस सुने चांग. जे एथीच्या वियोगी जीवो न सके.'

असे अनेक मुके प्राणी होते, ज्यांना स्वामींच्या दैवी सामर्थ्याचा प्रत्यय आला होता. असे बरेच मुके प्राणी लीळाचरित्रात आढळून येतात.

## भुजंगाचे समर्पण

स्वामींचे प्रवचन रोजच सुरू असायचे. संधी मिळताच ते प्रवचन करीत. अशा उपदेशाच्या अखंड वाहत्या प्रवाहात न्हाऊन निघणारे आणि कृतकृत्य

होणारे बरेच भक्तगण स्वामींचे या प्रबोधन यात्रेत येऊन सहभागी झालेले होते. त्यात एक सापही होता. स्वामी एका मंदिरात निवासाला होते. तेथे रोज सायंकाळी स्वामींचे शास्त्र निरुपण होत असे. ते ऐकायला अनेक लोक येत असत. 'सभा घनदाट बैसली असे' असे या सभांचे लीळाचरित्रकार वर्णन करतात. अशाच एका प्रवचनाचे सभेत एक भुजंग शिरला. त्याला पाहून सभेत धावपळ झाली. स्वामी म्हणाले, तुम्ही आलेत तसाच तोही प्रवचन ऐकायला आला आहे. तो तुम्हांस काहीही करणार नाही. निश्चिंत होऊन बसा.त्यालाही बसू द्या. खरेच तो नाग आपले डोळे स्वामीकडे एकटक लावून ऐकत होता. तो दररोज येऊ लागला. आता लोकांना त्याची भीती वाटत नव्हती. इतर सर्व श्रोत्यांसारखा तोही एक नित्य श्रावक बनला होता.

स्वामींचा मुक्काम हलणार होता. त्या गावात ते शेवटचे प्रवचन होते. ते प्रवचन संपले तेव्हा तो नागराज आपला पूर्ण फणा उंचावून जमिनीवर लोळला. जणु त्याने स्वामींना अभिवादन करण्यासाठीच हे लोटांगण घातले होते. परंतु दुसरेच क्षणी असे लक्षात आले की त्याच्या हालचाली बंद पडल्या आहेत. तो शांत झाला होता. त्याचे ते शेवटचे लोटांगण होते.

ते पाहून स्वामी म्हणाले,"न्या त्यांना. नेऊन सन्मानाने मूठमाती करा." या महान श्रावकाच्या अंत्ययात्रेसाठी बरेच लोक गेले होते. त्याला मूठमाती देण्यात आली. असा हा मुका नागराज स्वामींच्या अमृतवाणीचे श्रवण करून मुक्त झाला. असे कितीतरी हिंस्र प्राणी स्वामींच्या दैवी सामर्थ्याचे साक्षीदार होते.

**वाघही यात्रेत सहभागी!**

एकदा स्वामी तापी-पूर्णा संगमावर चांगदेव येथे निवासाला होते. तेथून ते मराठवाड्यात यायला शिष्यगणांसह निघाले. वाटेत जंगलातून एक खूप मोठा वाघ स्वामींच्या दिशेने झेपावत आला. स्वामींच्या जवळ वाघ आलेला पाहून भक्तगण घाबरले. पळू लागले. स्वामींनी त्या वाघाच्या डोक्यावर हात ठेवून त्याला कुरवाळायला सुरुवात केली. जणु तो पाळीव श्वान आहे, असा शेपटी हलवू लागला. स्वामी आपल्या भ्यालेल्या शिष्यांना म्हणाले,"या पोरे हो! भिऊ नका. हा तुम्हांस काहीही करणार नाही. तुमच्यासारखाच हाही आपला सहयात्री समजा. या!

भक्तगण हळूहळू जवळ आले. तो वाघ त्यांचेसह चालू लागला. तो काहीच

करीत नाही असे पाहून एका बाईने आपले डोक्यावरचे सामानाचे पोते काढून त्याचे पाठीवर ठेवले. सहयात्रीच तो. पोते पाठीवर वाहून नेऊ लागला. तो जणु पाळीव वाघच वाटू लागला. पाळीव श्वानाहूनही गरीब झालेला हा वाघ स्वामीसह पुढच्या गावापर्यंत आला. तेव्हा स्वामी त्या बाईस म्हणाले, ''बाई! आता तुमचे गाठोडे काढून घ्या. आता हे जातील.'' ती शिष्या म्हणाली, 'कां बाबा? येऊ द्या ना त्यास. तो आपले काहीच बिघडवत नाही. आता त्याची भीती उरली नाही. उलट पोते घेऊन चालण्याचा आमचा त्रास तो वाचवितो आहे. येऊ द्या त्याला आपले सोबत.'

स्वामी म्हणाले, ''ना बाई! आता तो कुणाला त्रास देत नाही, हे खरे आहे. परंतु तो त्रास देत नाही असे पाहून लोक आता त्याला त्रास देतील. आता जा!'' म्हणून वाघास स्वामींनी प्रेमाचा निरोप दिला.

हे पशूवरचे अकृत्रिम प्रेम आणि पशूंनाही ज्यांचा विश्वास वाटावा असे व्यक्तिमत्त्व साधारण नव्हते.त्यांच्यातील दैवी सामर्थ्य पशूंना दिसत होते. जाणवत होते. जसे नांदेडला स्वामी एका ब्राह्मणाच्या गाई चारायला घेऊन जात. त्या गाई स्वामींचेकडे सतत पाहत राहात. त्या पाहण्यानेच जणू त्यांची क्षुधाशांती होत असे. तसेच बीडला स्वामींनी गोदावरीच्या पात्रातील पाहिले होते. त्या प्रतिबिंबाकडे पाहत आनंद उपभोगणाऱ्या असंख्य मासोळ्या गोळा झालेल्या होत्या. त्या त्यांचे दैवी रूपावर वेधलेल्या मुक्या जीवांना स्वामींचे दैवी सामर्थ्याचे दर्शन झालेले होते. त्यांच्यातील दिव्यत्व त्यांना जाणविले होते.

**समतेचा अतुल पुरस्कर्ता :**

श्रीचक्रधर स्वामींचे पशुपक्षी आणि हिंस्र प्राण्यांवर अकृत्रिम प्रेम होते. तसेच त्यांचे सर्व मानव प्राण्यावरही समान प्रेम होते. त्यांचे भोवती गोळा झालेले भक्तगण बहुतांशी ब्राह्मण असले तरी ते उपेक्षित जातीतील माणसांनाही जवळ करीत असत.

एके दिवशी स्वामी आपले शिष्यासमोर प्रवचन करीत होते. जोगेश्वरीच्या मंदिराच्या आंत येण्यास मज्जाव असणाऱ्या तीन मातंगांनी स्वामी येथे असल्याचे ऐकले व ते मंदिराच्या दारात कळसाला जोहार करून थांबले. त्यातला एक म्हणाला, 'चला आता जाऊ!' दोघे म्हणाले, ''ना गा हे दैवत पाहिल्याविना न येवो.'' एक शिष्य मंदिराचे बाहेर आले. त्याना मातंगांनी सांगितले की आम्हांला

स्वामींचे दर्शन घ्यावयाचे आहे. तरी त्यांना बाहेर येऊन दर्शन देण्याची विनंती सांगा. कृपा करून स्वामींना हा आमचा निरोप कळवा.

शिष्यांनी स्वामींना हा निरोप सांगितला परंतु स्वामींना आपल्या प्रवचनातून उठून येता येत नव्हते म्हणून स्वामींनी त्या तिघांसाठी तीन लाडू प्रसाद म्हणून पाठविले. ते प्रसादाचे लाडू घेऊनही त्या तिघांनी परत निरोप पाठविला की स्वामीजींना सांगा की आम्ही दर्शनाशिवाय जाणार नाही. त्या मातंगांचा हा निग्रह पाहून स्वामी उठले व मंदिराच्या बाहेर आले. उंबरठ्याजवळ उभे राहिले. मातंगाने तो लाडू स्वामींना अर्पण केला. त्यांना साष्टांग दंडवत केले.

स्वामींनी तो लाडू हाती घेतला आणि आपल्या ब्राह्मण शिष्याकडे वळून ते म्हणाले, "कां गा प्रसादवादीए हो! प्रसाद घेयाल?

शिष्य म्हणाले, "दुधाभाता कोण हात आडवा करील? त्यावर स्वामी म्हणाले, "तैसा हा दूधभात नव्हे. हा तुमचे मनातला उच्च-नीचत्वाचा विकल्प झाडून टाकणारा दूधभात आहे. घेयाल? सर्वांनी होकार दिला आणि स्वामींनी लाडू सर्व ब्राह्मण शिष्यांना वाटला. त्यांच्या मनातला विकल्प झाडून टाकण्यासाठी स्वामींनी हे प्रसाद वितरण केले होते.

स्वामींनी समतेचा मंत्र शिकवताना एक काळजी मात्र घेतलेली होती. ती ही की त्यांनी हा समतेचा मंत्र शिकविण्यासाठी धर्माचा आधार घेतलेला होता. धर्माचे धागे तोडणारा क्रांतीचा तो उदंड भडक नारा नव्हता. आपल्या ब्राह्मण शिष्यांना शिखासूत्राचा त्याग करायला सांगणारा हा आगळा समग्रक्रांतीचा अग्रदूत ब्राह्मणांना उच्चतेचा अहंकार सोडायला सांगत होता. उच्चनीचत्वाच्या विचाराचा विकल्प मनात धराल तर मुक्तीची दारे तुमच्यासाठी उघडणार नाहीत म्हणून ज्यांना मोक्षमुक्तीची चाड असेल त्यांनी सर्व प्रकारचा विकल्प सोडायलाच पाहिजे. त्यामुळे मानवामानवात दुरावे निर्माण करणारे सर्व जातिगत विषमतेचे बांध आपोआपच खचून पडतील. असा जातिगत उच्च नीचतेच्या विकृत विचारांना विरोध करण्यासाठी तात्त्विक आधार देणाऱ्या स्वामींना म्हणूनच अद्वितीय क्रांतिकारक म्हणावे लागते. समतेचा मंत्र असा ममतेने शिकविणारा हा महान पुरुष म्हणूनच अद्वितीय अवतार ठरतो. पूजनीय ठरतो. वंदनीय वाटतो. त्यानंतर झालेल्या थोर-थोर सामाजिक क्रांतिसूर्यांनी भाषा आणि कार्याच्या प्रखरतेने अनेकांची मने पोळत ठेवली आणि त्यातून 'समता' निर्माण करण्याचा प्रयत्न

केला. असे प्रयत्न म्हणूनच मूलगामी ठरले नाहीत. उपेक्षित समाजाच्या जाणिवा जागृत करून प्रस्थापिताविरुद्ध बंड करण्याचे क्रांतिकार्य म्हणूनच मूलगामी परिवर्तनाच्या यशाचे श्रेय मिळवू शकले नाही. हे पाहिल्यावर वाटते की श्रीचक्रधरांचे विचार जर महाराष्ट्रातील बहुसंख्य लोकांनी वेळीच मान्य केले असते, तर महाराष्ट्रात सात शतकाआधीच मूलगामी क्रांतिपर्व आकारास आले असते. सामाजिक समतेचा दीप तेव्हाच प्रकाशित झाला असता. आणि आजच्या सामाजिक कटुतेने पोसलेली दुःखे उरली नसती. ती केव्हाच नामशेष झाली असती.

## स्वामींच्या विद्वतेला आव्हान

महाराष्ट्राच्या गंगातीरावर विद्वानांची एक सांस्कृतिक परंपरा नांदत होती. उभय गंगातीरावरच्या गावागावात वेदविद ब्राह्मण लोकांची वस्ती होती. सकलशास्त्रसंपन्न लोक या प्रदेशात वावरत होते. तिथेच श्रीचक्रधरांचा धर्मप्रचार सुरू होता. ते नित्य आपल्या प्रवचनाने लोकांना गूढ तत्त्वज्ञान मराठीतून सांगत असत. ब्रह्मविद्या ब्राह्मणाशिवाय अन्यांचे कानी पडू नये अशी समजूत अनेक उत्तरकालीन श्रुतींनी पक्की केली होती. ब्रह्मविद्येची महान वाणी ब्राह्मणेतर त्रैवर्णाचे कानी पडली तर त्यांच्या कानात उकळते तेल टाकण्याची आतताई शिक्षाही काही स्मृतिकारांनी सांगितलेली होती. आणि श्रुती-स्मृतीचे पलीकडे काही 'तत्त्वज्ञान' असू शकते यावर ज्यांचा मुळीही विश्वास नव्हता अशा कर्मठांना श्रीचक्रधरांच्या ब्रह्मविद्येचा सुकाळ करणाऱ्या प्रवचनांमुळे काय वाटले असेल? ती प्रवचने सुद्धा लोकभाषेतूनच देण्यात येत होती ही तर धर्ममार्तंडाच्या आणि कर्मठांच्या दृष्टीने मोठीच निषिध्द कृती होती. या कृतीस दंडित करण्याचा विचारही काही तथाकथित धर्ममार्तंड करीत असणारच. स्वामींशी तत्त्वचर्चा करून त्यांच्या ज्ञानाची खोली तपासण्याचाही काही पंडित प्रयत्न करीत असणारच. स्वामींना तत्त्वज्ञानचर्चेत हरविण्याचा विचारही काहींच्या मनात आला असणारच. तशातलाच एक महापंडित स्वामींशी वादविवाद करायला आला होता. या वादविवादात आपण नक्कीच श्रीचक्रधरांना परास्त करू असा अभिमानयुक्त विश्वास घेऊन तो आला होता.

तो होता षड्शास्त्रसंपन्न वेदोनारायण महींद्रभट्ट! याने वेदांतादि सकल शास्त्रांचा अभ्यास केल्यावर एक प्रभाकरशास्त्र महाराष्ट्रात शिकविल्या जात नसे ते शिकण्यासाठी हा आंध्र प्रदेशात जाऊन आला होता. असा हा 'सकलशास्त्र पारंगत पंडित' महींद्रभट्ट स्वामीशी वादविवाद करायला आला होता.

एके दिवशी हा डोमेग्रामला आला. तो दिवसा दिवट्या लावून चालत असे. तो म्हणायचा आकाशात एक प्रकाशदायी सूर्य आहे आणि या भूतलावर मी एक अजिंक्य ज्ञानसूर्य आहे. तसेच त्याचे पायात गवताची वाकी (तोडा) असायची. तो म्हणायचा की पृथ्वीवरचे सर्व विद्वान माझ्यासमोर तृणवत आहेत. ते सर्व माझ्या पायातील या वाकीसारखे क्षुल्लक आहेत. इतका विद्येचा अहंकार असणारा हा महाराष्ट्रातील महापंडित श्रीचक्रधरांना वादात जिंकायचा निश्चय करूनच आलेला होता.

महींद्रभट्ट गणपत आपयो नावाच्या विद्वान ब्राह्मणाचा भाचा आणि जावई होता. गणपत आपयो हे शासकीय अधिकारी होते. महींद्रभट्टास षड्शास्त्राचे प्राथमिक पाठ या मामानेच दिलेले होते. परंतु या महाराष्ट्रात शंकराचार्यांचे अद्वैताचे अभ्यासाशिवाय अन्य शास्त्रांचा अभ्यास करण्याची सोय नव्हती. त्यातलेच एक प्रभाकरशास्त्र शिकविणे येथे निषिद्ध मानल्या जात होते. ते शिकविणाऱ्याचे वंशात दिवा लावणारा राहत नाही, त्याला कोड फुटते वगैरे भीती दाखवून येथे प्रभाकरशास्त्राच्या अभ्यासास मनाई करण्यात आलेली होती. शांकरीय अद्वैत सिद्धांताचे कट्टर पुरस्कर्ते पं.बापट शास्त्री म्हणतात की आमच्या आचार्यांचे अद्वैत मताचा महाराष्ट्रात एवढा प्रभाव होता की येथे अन्य मतांचे अध्ययन अध्यापन उरलेलेच नव्हते. या त्यांच्या मताची पुष्टी स्वामींचे काळी अव्दैत मताव्यतिरिक्त व त्यास पूरक व्याकरणादि विचाराव्यतिरिक्त अन्य मतांच्या अभ्यासाची सोय येथे नसल्याचा पुरावाच महींद्रभट्टाच्या आंध्र देशात जाऊन अन्य मताच्या अभ्यासाचे या नोंदणीवरून मिळते.

असा हा सकलशास्त्रसंपन्न महान पंडित श्रीचक्रधर स्वामींकडे आपल्या अभ्यासाभिमानाच्या परोटल्या शिगोशीग भरून आला होता. आपले प्रथम विद्यागुरू श्री गणपत आपयोच्या सूचनेवरून महींद्रभट्ट स्वामींना भेटायला आले होते. गणपत आपयो महींद्रभट्टांचा विद्येचा अहंकार पाहून म्हणाले होते की , तू श्री चांगदेव राऊळ गोसावीयांशी चर्चा करशील तर तुझ्या या विद्यार्जनाचे साफल्य होईल.

त्यावर महींद्रभट्ट म्हणाले होते,

काय ते विद्वान आहेत? -

विद्वान आहेत की नाही ते माहिती नाही परंतु ते एक महात्म्ये आहेत.- गणपत आपयो.

काय ते संस्कृत जाणतात?- महींद्रभट्ट.

माहिती नाही. परंतु ते मराठी अनावर बोलतात.-गणपत आपयो.

ते कोठे आहेत?-महींद्रभट्ट.

ते डोमेग्रामला राजमठात आहेत. चला मी तुम्हांस घेऊन चालतो.-गणपत आपयो.

ते दोघेही निघाले. भामाठाणेपर्यंत आले, तेव्हा गणपत आपयो यांना गावात काही भेटी गाठी घ्यायच्या होत्या. त्यामुळे ते थांबले. परंतु रस्त्याने पिंपळे वामनपंडित डोमेग्रामला स्वामींच्या दर्शनालाच जात होते. त्यांना गणपत आपयो यांनी सांगितले की महींद्रभट्टांना स्वामींकडे घेऊन जावे.

महींद्रभट्ट वामनभट्टासह स्वामींच्याकडे आले. तेव्हा स्वामी राजमठात बसले होते. स्वामींचे दर्शन होताच वामनभट्टांनी त्यांना साष्टांग दंडवत केले. परंतु विद्येचा गर्व असणाऱ्या महींद्रभट्टानी मात्र कायाप्रमाण केला. त्यानंतर त्यांची स्वामींशी नजरानजर झाली. स्वामींच्या समोर दोघेही बसले.

महींद्रभट्ट रस्त्याने येत असताना मनात अनेक युक्तीवाद घोळवत आले होते. मी स्वामींना अडविण्यासाठी अशा अशा-आशंका विचारील. संस्कृतातून अनेक शंका विचारून या स्वामींना परास्त करील. आजवर महींद्रभट्टांनी अनेक विद्वानांना वादात जिंकले होते. ते सर्व अवघड प्रश्न आठवून आठवून त्यांनी पाठ केलेले होते. त्यांना खात्री होती की आपण या महात्म्यांनाही लीलया जिंकू शकू.

परंतु ते स्वामीजवळ बसले तेव्हा हे सर्व पूर्वीचे वादविवादातील कठीण प्रश्न विसरले. त्यांना रस्त्याने आठवत होते. ते येथे काहीच आठवेना. ते स्वामीचे दिव्य दर्शनांनी प्रभावित झाल्यामुळे त्यांना काय प्रश्न विचारावेत हे स्मरत नव्हते. प्रश्न स्फुरत नव्हते. बराच वेळ निःशब्द वातावरणात गेला. पिंपळे वामनभट्ट महींद्रभट्टांना म्हणाले, "भट्टो ! दर्शन झाले आता चला ना?" महींद्रभट्ट तंद्रीतच होते. ते उठायला तयार नव्हते. स्वामी वामनभट्टांना म्हणाले, "भट्टो! तुम्ही चला, यांना यावेसे वाटेल तेव्हा हे येतील. यांना येथे राहावेसे वाटेल तोवर हे राहतील. मग येतील. तुम्ही चला. वामनभट्ट दंडवत करून निघून गेले.

महींद्रभट्ट प्रश्न विचारीत नव्हते. बोलतही नव्हते. ती निःशब्द स्थिती संपविण्यासाठी स्वामी म्हणाले, आत्यंतिक संसृती छेद होय ऐसी काही प्रतीती आती?

त्यावर महींद्रभट्ट म्हणाले,

होय येते. तशी प्रतीती येते. ती आली नाही तर तुमचे-आमचे विद्वत्तेला अर्थच काय? मग आपण कशासाठी जगायचे? महींद्रभट्टाने अशा अर्थाचे दुरुत्तर दिलेले पाहून बाईसा रागावून म्हणाल्या-

"अरे तुझी या बाबावर प्रतीती नाही. यांना दुरुत्तर देतोस? एवढ्यातच बाईसा थांबल्या नाहीत तर आपल्या स्त्री स्वभावाला धरून त्यांनी शिव्याशापही द्यायला सुरुवात केली.

त्यावर स्वामींनी हात आडवा करून बाईसांचे बोलणे थांबविले. त्यांना बोलण्यास हात, डोळे आणि श्री मुकुटाने विरोध करून म्हटले, 'बाई थांबा! असे काही या अभ्यांगतास बोलू नका. बाई! जीवावर अनंत जन्माची मळपुटे बसलेली असतात. ती पूर्वसंस्कारांची अज्ञानजन्य मळपुटे एकदम कशी फिटतील? कशी नासतील? ती मळपुटे कोणी तरी ज्ञानांजनाने झाडून टाकल्याशिवाय नाहिशी होतील कशी?

आणि बाई! पूर्वी तुम्हीही आमचेशी अशाच नव्हत्या का वागलात? तुम्ही आमचेसाठी पायपुसणे टाकूनच आमचे स्वागत केले नव्हते का? शिळा दुधी करटा जेवायला नव्हता का दिला?

यावर बाईसा वरमल्या आणि अनुतापपूर्वक म्हणाल्या-पुरे बाबा! पुरे करा हो महाराज!

स्वामी परत महींद्रभट्टाकडे वळून म्हणाले,

"ती आत्यंतिक संसृती छेद होईल अशी प्रतीती येते. म्हणता तर ती कशी येते ते सांगाल काय?

महींद्रभट्ट म्हणाले-

"कर्म कीजे! कर्मामुळे अंतःकरण शुद्ध होते. शुद्ध अंतःकरणाने वैराग्य उपजते. वैराग्याने ज्ञान होते. ज्ञानोदयाने मोक्ष मिळतो." यावर सर्वज्ञ श्री चक्रधर म्हणाले,-

"भट्टो! नित्य नैमित्तिक कर्मे जशी सकाळी उठून मलविसर्जन, मुखमार्जन स्नानादि कर्मे तसेच यज्ञविधी आणि कर्मकांड त्या त्या व्यवहारात खर्ची पडतात. त्याचा काही पुढे लाभ होत नाही.

दुसरे काही कर्मे कराल ती त्याचे फळ देऊन जातात. जशी स्वयंपाकनिष्पत्ती

करण्याचे कर्म हे निष्पत्तीचे फळ देऊन जाते. ते भोजन करून तृप्त होण्यासाठी उपयोगास येतील. एखादी वस्तू घडविण्याचे कर्म कराल तर ती त्या वस्तूचे रूपाने फलित होऊन तुमचे फलोपभोगास जाईल. एखादे नवसर्जन केले तर त्याचेही फळ मिळते व तेही उपभोगाचे रूपाने संपून जाईल. इतर कामक्रीडारूप कर्मेही फलाभिलाषातृप्तीने संपून जातील. मग त्याने अंतःकरणशुद्धी कशी होऊ शकेल बरे?

तसेच इतर नैमित्तिक कर्मे जसे इतर फलप्राप्तीसाठी करावयाची कामे, नवससायास, पुत्रप्राप्ती वा इतर सुखप्राप्ती आणि दुःखनिवृत्तीसाठी करावयाची धार्मिक कार्ये ही नैमित्तिक कर्मे त्या त्या कर्मफलात उपयोगी जातात. त्याने अंतःकरणशुद्धी कशी व्हावी? असे अंतःकरण शुद्ध झाले नाही तर मग तुम्हांस वैराग्य कसे उपजेल? वैराग्य उपजले नाही तर मग ज्ञानोदय व्हावा तो कसा? मग मोक्ष कसा मिळावा भट्टो?

भट्टो!'अविद्यायुक्त जीवा' स्वतः ज्ञान संभवत नसते. जीव मुळातच अविद्या युक्त आहे. अज्ञानी आहे. त्याचे अज्ञान दूर करण्यासाठी कुणी ज्ञान देणे आवश्यक आहे. स्वामींचे तर्कसंगत युक्तिवादाने महींद्रभट्टांची अडवणूक होत होती. हे मराठीत अनावर बोलून युक्तिवाद करतात. मराठीतून आपण यांचेशी वादविवाद करून यांना परास्त करणे शक्य दिसत नाही. म्हणून आता यांचेशी संस्कृतातून बोलले पाहिजे, हा विचार करून महींद्रभट्टानी संस्कृत भाषेतून प्रश्न विचारणे सुरू केले आणि स्वामी श्रीचक्रधरांनी त्यांची उत्तरे संस्कृतातून तितक्याच समर्थपणे दिलीत. त्यामुळे हा महापंडित स्वतःला पृथ्वीवरचा ज्ञानभास्कर म्हणविणारा वाक्पटू वरमलाच! लज्जित झाला.

स्वामींनी पुन्हा आपल्या सूत्राचा वसा धरून म्हटले, ''अविद्यायुक्ता जीवास स्वतः ज्ञान संभवत नाही.'' त्यावर एक दृष्टांत देण्यासाठी ते म्हणाले,-भट्टो! ''बांधली गाय असे : ते सुटावेया लागौनि खुटाभवती भवे : तेणे तियेचा गळा अधिकची आवळे : जेणे बिरडे लाविले तो सोडी तै सुटे : का तिये जातीचे लेकरु सोडी तै सुटे :''

त्यावर पुनश्च अडवणूक करण्यासाठी काही प्रश्न उपस्थित करून महींद्रभट्ट बोलतात. त्यांच्या बोलण्याचा संपूर्ण वृत्तांत लीळाचरित्रात उपलब्ध नाही परंतु त्यांच्या चर्चेत निश्चितपणे काही अडवणुकीचे प्रश्न आलेच असणार असे गृहीत

धरून त्याची ही चर्चा करणे अप्रस्तुत होणार नाही.

संपूर्ण वेदवाङ्मयात, ब्राह्मण्यकांत आणि आरण्यकांत कर्मकांडाची मांडणी केलेली आहे. त्या कर्मकांडात आलेली कर्मे मोक्षप्राप्तीसाठी उपयोगात येतात असेही काही वेद विभागात सांगितलेले आहे. मग स्वामींनी नित्य नैमित्तिक कर्मे आणि कामिक कर्मे यांचे वैफल्य सांगितले तसे या 'वैदिक कर्मकांडातील कर्माबद्दल काही सांगितलेले नाही. त्यामुळे ती वैदिक कर्मे तथा याज्ञिक कर्मे माणसाच्या मुक्तीसाठी उपयोगास येतील म्हणून त्या कर्माने अंतःकरण शुद्धी होईल आणि अशा अंतःकरण शुद्धीने वैराग्य उपजेल, अशा वैराग्यामुळे ज्ञानोदय होईल, असा ज्ञानोदय त्या कर्मठास पुढे मोक्षाची वाट प्रशस्त करीत नेईल, असे समजण्यात काय अर्थ आहे?

हा प्रश्न पं. बापट शास्त्री यांनी आपल्या 'गीता रहस्यार्थ' या टीका ग्रंथात उपस्थित करून लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्य या ग्रंथातील कर्मप्रधान मूलगामी विचारांवर प्रहार केलेला आहे. ते म्हणतात की लोकमान्य टिळक हे दैनिक कर्मांना, ज्यात शौचविधी, मुखमार्जन, पाकनिष्पत्ती, धान्योत्पादन आणि प्रजोत्पादन आदिसाठी होणाऱ्या कर्मांनाच 'कर्म' समजतात. परंतु ही नित्यनैमित्तिक कर्मे आणि कामिक कर्मे ही गीतेला अपेक्षित नाहीत. गीतेला वैदिक कर्मकांडातील याज्ञिक कर्मे आणि इतर श्रुतिस्मृतीने सांगितलेली कर्मेच अपेक्षित आहेत. त्या वैदिक कर्मामुळेच अंतःकरण शुद्धी होते. त्यातूनच वैराग्य उपजते आणि या वैराग्यातून ज्ञानोदय होतो. मग त्याच ज्ञानोदयातून मोक्ष मुक्तीची प्राप्ती होते. असा पं. बापट शास्त्री यांचा युक्तिवाद आहे. असा हा लोकमान्य टिळक आणि पं. बापट शास्त्री यांचा वाद हा महींद्रभट्ट आणि स्वामीतही रंगला असणार. हा सनातन वाद आहे. तो प्राचीन काळातही विव्दानांच्या चर्चेचा आणि वादाचा विषय होता. या संदर्भात जुन्यात जुना वाद येथे नमूद करणे संयुक्तिक होईल.

कर्मप्रधान वैदिक धर्मातील याज्ञिक कर्मे आणि इतर अनुष्ठाने ही मोक्षमुक्तीकडे नेणारी नसतात. अशी बऱ्याच 'उपनिषदकारांची' ग्वाही आहे. मुंडकोपनिषदात अशा याज्ञिक कर्मकांडाचे वैफल्य सांगितलेले आहे. 'प्लवा हे ते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येशू कर्म : एतच्छयो ये ऽभिनन्दन्ति मूढा जरा मृत्यू ते पुनरेवाभियांति॥' भावार्थ असा की सोळा ऋत्विज आणि यजमान व यजमान पत्नी या अठरा जणांनी केलेले यज्ञ फुटक्या नावेसारखे आहेत. हे यज्ञच

श्रेयसाधक आहेत म्हणून आनंद मानणारे मूर्ख लोक पुन्हा पुन्हा म्हातारे होऊन मृत्यू पावतात. स्वच्छ आणि कठोर शब्दात यज्ञकर्माच्या वैफल्याचा असा निर्वाळा देणारे हे उपनिषद 'वेदान्त-वेदान्त' म्हणून गौरवान्वित केले जाते. त्यामुळे ही यज्ञकर्मे मोक्षमुक्तीसाठी उपयोगाची नाहीत हे उघड आहे. म्हणून स्वामी म्हणाले तशी कोणतीही कर्मे-नित्यकर्मे, नैमित्तिक कर्मे, कामिक कर्मे आणि याज्ञिक कर्मे-ही मोक्षमुक्तीची साधने होऊ शकत नाहीत, हे स्पष्ट आहे हे पं. महींद्रभट्टांच्या लक्षात आले. त्यामुळे ते स्वामींच्या सर्वज्ञतेच्या दर्शनाने प्रभावित झाले आणि त्यांची विद्वत्तेची आढ्यता पार लयाला गेली. त्यांचा ज्ञानाचा अहंकार नाहीसा झाला. काळ्या मातीच्या ढेकळावर पाण्याची धार पडल्यानंतर ते ढेकूळ जसे विरून जावे तसा त्यांचा अहंकार स्वामींच्या ज्ञानप्रकाशाने क्षणार्धात विरून गेला. स्वामींनी त्यांना एक स्पष्ट सिद्धांत सांगितला. तो जीवनाच्या साफल्याच्या शोधात असणाऱ्या सर्वच मनुष्यमात्राला सर्व स्थळी आणि सर्व काळी परममार्गदर्शक ठरणारा आहे. स्वामी म्हणाले,

**''सृष्टीमध्ये कव्हणे करणे मुंचिजेना एके परमेश्वरे विणः''**

जगातील भवतापाने दग्ध झालेले जीव सुखप्राप्तीसाठी नाना प्रयत्न करीत असतात. जन्म, मृत्यू जराव्याधिमय संसारचक्रांत सापडलेले जीव जसजसे सुखाच्या शोधासाठी प्रयत्न करतात तसतसे ते सुख पुढे पुढे पळताना दिसते. यामुळे सुखाभिलाषी माणसाची स्थिती भ्रामक मृगजळाच्या शोधासाठी सैरावैरा पळणाऱ्या मृगासारखी होते. संत तुकोबाराय म्हणतात,'सुख पाहता जवापाडे। दुःख पर्वताएवढे।।' अशी मानव प्राण्याची अवस्था होते. त्यामुळे लहानशा सुखप्राप्तीच्या अभिलाषेने धावणाऱ्याच्या वाट्यास दुःखाचे डोंगर येतात. खरे म्हणजे या जगात कोणतेही सांसारिक सुख अल्पजीवी असते. दुःख मात्र आपले सातत्य टिकवून असते. म्हणूनच गौतम बुद्ध म्हणतात तसे या जगांत 'सब्बं दुःखम्' हेच खरे आहे, असे वाटू लागते. या सर्व दुःखातूनच कायमची सुटका व्हावी, निरंतर सुखानंद प्राप्त व्हावा असे वाटत असेल तर ते देण्याची क्षमता केवळ एका परमेश्वरातच आहे. म्हणून त्याला अनन्यभावे शरण जावे हेच श्रेयस्कर धर्माचरण आहे. अशा निरंतर सुखानंदाच्या प्राप्तीचेच नाव मोक्ष किंवा मुक्ती आहे.

वैविध्यपूर्ण ज्ञानार्जनाची मत्ता हे माणसाच्या कायम सुखानंदाचे साधन होणे शक्य नाही. सुखाचा खरा झरा हा निरामय आनंददायी असतो. तो अक्षय आनंद

हा इंद्रियांच्या द्वारा घेणे शक्य नसते. इंद्रियजन्य सुखे ही अल्पजीवी असतात. जिभेच्या चवीसाठी आपण पव्कान्न खातो. काही काळ एका विशेष तृप्तीचा सुखानंद लाभतो. परंतु ती पक्वान्न खाण्याची इच्छा परत उद्भवते. अशी पुन्हा पुन्हा उद्भवणारी इंद्रियजन्य सुखोपभोगाची इच्छा माणसाला या सांसारिक बंधापासून कायमची तृप्ती वा आनंद देऊ शकत नाही. म्हणून ही सांसारिक सुखोपभोगाची इच्छा सोडून एका परमानंदाचा लाभ देणाऱ्या परमेश्वराला शरण जाण्यानेच खराखुरा सुखानंद लाभतो. तो अक्षय असतो. त्याचेच नाव मुक्ती आहे. त्यालाच मोक्ष म्हणतात. त्या अवस्थेलाच स्वामी श्रीचक्रधरांनी 'मुंचन' म्हटलेले आहे. असे मुंचन परमेश्वराशिवाय अन्य कशानेही होत नाही. हा स्वामींचा हितोपदेश पं. महींद्रभट्टांना पटला.

महींद्रभट विलक्षण चिकित्सक होते. त्यांनी अनेक प्रश्न विचारून स्वामीकडून बरेच निरुपण करवून घेतले. स्वामींचे दार्शनिक विचार ऐकून त्यांना प्रतीती आली की हे प्रत्यक्ष परब्रह्म परमेश्वराचे साक्षात करचरणवत रूप आहे. त्यामुळे त्यांनी सुरवातीला टाळलेला साष्टांग दंडवत करून स्वामींना मनोभावे वंदन केले. वेळ बराच झाला होता. बाईसा म्हणाल्या, 'बाबा : उसीरू जाला :' त्यानंतर महींद्रभटासह स्वामींचे भोजन झाले. भोजनोत्तर महींद्रभट गावास निघून गेले. परंतु हा पंडित ब्राह्मण आता पुरता स्वामींकडे वेधला होता. तो पुन्हा पुन्हा येऊन स्वामींना तात्त्विक शंका विचारायचा. त्याची उत्तरे मिळाल्यावर समाधानाने घराकडे परतायचा. या त्यांचे येण्यामुळे स्वामींचे तत्त्वज्ञान आकारास आले. स्वामींच्या सूत्र पाठातील नव प्रकरणांचा जन्म असा महींद्रभट्टाच्या शंका समाधानातून झाला. एका विचक्षण तत्त्वज्ञ जिज्ञासू भक्ताच्या चिकित्सक शंकाच्या समाधानासाठी दिली गेलेली उत्तरे तर्कसंगत तत्त्वज्ञानास जन्म देऊन गेलीत.

### महावाक्य

महींद्रभट थोर विद्वान होते. भारतीय तत्त्वज्ञानाच्या सर्व शाखांच्या स्वरूपाचे ज्ञान त्यांना होते. त्यांना शांकरीय अद्वैताचे ज्ञान होते, तसेच रामानुज, वल्लभाचार्य, माध्वाचार्य आणि निंबार्काचार्यादिकांच्या अंशतः द्वैतवादी तत्त्वज्ञानाचीही त्यांना माहिती होती. 'ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या' हे शांकरीय वेदांताचे सूत्र त्यांना तर्कसंगत विचारासह माहिती होते. किंबहुना तत्त्वज्ञान चर्चा हाच त्यांच्या अभ्यासाचा विषय होता. त्यामुळे त्यांना स्वामीकडून या सृष्टिरचनेचे गूढ समजून घेण्याची जिज्ञासा

होती. त्यासाठी ते सराळ्यावरून डोमेग्रामला सतत येत असत. त्यांच्या मनात शांकरीय अद्वैत वेदान्त ठसलेला होता. तो तपासून पाहण्याची त्यांना जिज्ञासा होती. अद्वैत शांकरीय मताचे विद्वान म्हणत की, जग मिथ्या आहे. जे जे दिसते ते सर्व नाशिवंत आहे. माया या उपाधीने शबलीत झालेले ब्रह्म म्हणजेच शिव आणि अविद्या या उपाधीने दूषित झालेले ब्रह्म ते जीव आहे. माया आणि अविद्या या खोट्या आहेत. भ्रामक आहेत. त्यामुळे शेवटी जीव आणि शिव या दोन्ही वस्तु भ्रामक असून सत्य केवळ एक ब्रह्मच आहे. म्हणून या सृष्टीत सर्वत्र बहुरंगी-बहुरूपाने नटलेले सर्व ब्रह्मच आहे. हा अद्वैताचा सिद्धांत पटवून देण्यासाठी शांकरीय अद्वैती म्हणतात की दोरी सर्पासारखी भासली तरी तिला सर्प समजणे जसे भ्रममूलक आहे, तसेच हे दृश्य जगत भ्रममूलक आहे. ते सत्य भासत असले तरी तो एक भ्रमच आहे. सोने आणि अलंकार हे दोन काय भिन्न म्हणता येतील? तसेच हे दृश्य जग आणि त्यामागची एकमेव सत्यवस्तु ब्रह्म हे एकच आहे. घटाकाशन्यायाने अनेक घटांत पडणारे सूर्यबिंब वेगवेगळे मानता येत नाही तसे हे नानारूपाने नटलेले जग आणि ते परमतत्त्व वेगवेगळे मानणे भ्रम आहे. मातीच्या अनेक आकाराच्या वस्तू घडविल्या तरी त्याची मूळ वस्तू माती एकच नाही का? तसेच या जगाचे मूळ स्वरूप एकमेव बह्म रूपच आहे. तेच केवळ सत्य आणि बाकी सर्व भ्रामक आहे. हे आणि असे प्रसिद्ध युक्तिवाद महींद्रभट्टांना माहिती होते. ते पुढे करून 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' या शांकरीय वेदांताच्या सत्यासत्यतेसंबंधीचे प्रश्न महींद्रभट्टानी स्वामींना विचारले असतील त्यावर साधकबाधक चर्चा करून श्रीचक्रधर स्वामींनी 'असे ऐक्य मानणे कसे चूक आहे, हे दृष्टांताद्वारे पटवून दिले. त्यावर सतत चर्चा होत राहिली. शेवटी स्वामींनी आपला परमश्रेष्ठ सिद्धांत सांगितला. तो त्यांचा परमसिद्धांत सांगण्यापूर्वी श्रीचक्रधरोक्त तत्त्वज्ञानाचे अभ्यासक महानुभावीय पंडित परंपरेने या अद्वैताच्या प्रसिद्ध तर्क अथवा न्यायासंबंधी काय म्हणतात ते येथे थोडक्यात पाहणे उपयुक्त होईल.

(१) वेदांती म्हणतात की जीव हा या ब्रह्माच्या सागरपृष्ठावरील एक तरंग आहे. तरंग आणि सागराचे पाणी हे वेगवेगळे करता येईल काय? ते वेगळे समजणे भ्रममूलकच नाही का? असा वेदान्ती विद्वांनाचा युक्तिवाद असतो.

या वेदान्त्यांच्या युक्तिवादावर महानुभावीय विचारवंत म्हणतात की जीव

जर तरंगवत म्हटला तर त्याच्या कर्मविपाकाचा प्रश्न उद्भवतो. कर्मविपाक नसेल तर भोग आणि क्षय, स्वर्ग आणि नरक, मोक्षमुक्ती या सर्व वैदिक कल्पनाच फोल ठरतील. म्हणून हा युक्तिवादच व्यर्थ आहे. चूक आहे. तरंग निर्माण होतो, तेथेच तो विलयास जातो. तरंग आणि सागराचे ऐक्य भंगत नाही. तसेच जर या जीव नावाच्या ब्रह्माचे शिव नावाच्या ब्रह्माशी नाते असेल तर त्यास म्हणजे जीव नावाच्या ब्रह्मास मोक्ष-मुक्तीची साधने करण्याची गरजच राहणार नाही. कारण सागर पृष्ठावरील तरंगास सागराशी एकरूप होण्यासाठी स्वतः वेगळे काही करण्याची गरजच नसते. ती क्रिया आपोआपच घडत असते. मग भवसागर तरून जाण्याची चिंता संतांनी, धर्मज्ञांनी, वा आचार्यादिकांनी का करावी? जप, तप, अनुष्ठाने आणि यज्ञयाग, पूजा, विधी, करण्याची गरजच उरणार नाही. म्हणून हा पक्ष अर्थात याज्ञिक क्रियाकर्म आणि कर्मविपाकाचा पुरस्कार करणाऱ्या वैदिकांनी 'तरंगवत' जीव मानणे चूक आहे.

(२) सोने आणि अलंकार या दोन्हीची जशी सारूप्यता आहे, एकत्व आहे तसे जीवेश्वराचे मानणेही चूकच ठरणार आहे. कारण जीव हा अज्ञान, मळीन,दीन आणि सदैव दुःखी आहे. ईश्वर ऐश्वर्यसंपन्न आहे. जीव एकदेशी आहे तर परमेश्वर सर्वगामी आहे. तसेच सोन्याचे अलंकार घडविणारा कुणी तिसरा सोनार असावा लागतो. इथे परमेश्वररूपी सोन्यात अविद्यारूपी मळ मिसळून त्याचा जीवरूपी विकृतालंकार आकारास घालणारा कुणी तिसरा कुशल कारागीत अस्तित्वातच नाही. अविद्यारूपी अचेतन भ्रामक वस्तूने निराकार परमऐश्वर्ययुक्त ब्रह्म स्वरूपात नवीनच जीव नावाची वस्तू बनली असे म्हणणे म्हणजे चंद्रकिरणापासून पक्वान्नोत्तम बनविण्यासारखे कल्पनेच्या खेळातले भ्रममूलक कार्य आहे. ते अचिंत्य आहे. म्हणून हाही वेदांताचा युक्तिवाद टिकण्यासारखा नाही.

(३) जर जीव स्वरूप हे परमेश्वराचे (ब्रह्माचे) प्रतिबिंब आहे असे म्हणावे तर घटातील पाण्यात पडलेली पडछाया जशी पाण्याने लिंपायमान होत नाही तशी या देहघटातील जीव नावाचे ब्रह्म सुकृत दुष्कृत्याने लिंपित व्हायला नको. तसे घडले तरच हा युक्तिवाद तर्कसंगत म्हणता येईल. पण तसे घडत नाही.

(४) तसेच घटाकाश न्यायानुसार घटात असलेली पोकळी घटाचे संगतीने

विकार पावत नाही. परंतु हा जीव मात्र क्षणाक्षणाला प्रकृतीच्या संगतीने विकरित होताना दिसतो. क्षणार्धही तो कर्माशिवाय व म्हणून विकाराशिवाय राहत

नाही. म्हणून घटाकाश न्याय सुसंगत वाटत नाही.

या सर्व युक्तिवादावरून असे स्पष्टपणे दिसते की जीव आणि देव हे दोन भिन्न पदार्थ आहेत. त्यांचे स्वतंत्र अस्तित्व मान्य करणे युक्तिसंगत आहे. या पार्श्वभूमीवरून श्रीचक्रधर स्वामींनी महींद्रभट्टांना सांगितलेल्या महावाक्याचा विचार करण्याची गरज आहे.

महींद्रभट्टास स्वामींनी हा सिद्धांत सांगितला होता. तो असा-

''जीव प्रपंच व्यतिरिक्त : सच्चिदानंद स्वरूप : परमेश्वर एकु आति : तो सर्व शक्ती युक्तः''

या सूत्रात स्वामी म्हणतात की जीव आणि प्रपंच या दोन नित्य पदार्थाव्यतिरिक्त म्हणजे वेगळा असा एक सर्व शक्तीयुक्त परमेश्वर आहे. म्हणजे या जगांत प्रपंच,जीव आणि परमेश्वर या तीन नित्य वस्तू आहेत.

गीतेत 'प्रकृतिः पुरुषंचैव **विद्यनादी उभावपि**' असे स्पष्टपणे म्हटलेले आहे. त्यामुळे प्रकृती म्हणजेच प्रपंच आणि पुरुष म्हणजेच जीव हे दोन नित्य पदार्थ गीतेला मान्य आहेत. म्हणून गीता, उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रे या प्रस्थानत्रयीवर भाष्ये लिहिणाऱ्या आचार्यांना हे तिन्ही पदार्थांचे अनादित्व अमान्य करता येणे युक्ति संगत वाटत नाही. स्वामींनी मात्र या तीनही पदार्थांचे स्पष्टपणे अनादित्व प्रतिष्ठित केलेले आहे.

श्रीचक्रधर स्वामींनी हे तीन पदार्थ अनादिचे म्हणून सांगितले, ते महींद्रभट्टाना युक्तिसंगत वाटले म्हणून त्यांनी पुढे विस्तार करून या सृष्टिरचनेचे रहस्य विचारले. त्यावेळी स्वामींनी पुढे असे म्हटले की परमेश्वर हा 'सर्वशक्तियुक्त' आहे. या शब्दांत सर्व देवतांचा समावेश आहे. तसाच शक्ती शब्दांत सकळ गुण, सकळ धर्म यांचा अंतर्भाव होतो.

सर्व देवता आणि सर्व गुण यांनी परमेश्वरयुक्त आहे. याचा अर्थ सर्व देवतांच्या शक्ती त्याचे स्वरूपात अंतर्भूत आहेत. त्या शक्ती त्याचे स्वाधीन आहेत. असे असले तरी परमेश्वर आणि या देवताशक्ती या स्वरूपतः भिन्न आहेत. परमेश्वराइतक्याच या देवताही अनादिच्या आहेत.

यावरून श्रीचक्रधर स्वामींनी या सृष्टीत चार वस्तू नित्य असल्याचे सांगितले आहे. जीव, देवता, प्रपंच आणि परमेश्वर या त्या चार नित्य वस्तू कल्प-कल्पांतीही नष्ट होणाऱ्या नाहीत. त्या नित्य आहेत. हे सत्य स्पष्ट झाले की भ्रामक अशा जिवा

शिवाचे अस्तित्व मानण्याचा व ते सिद्ध करण्याचा वृथा तर्कवाद लढविण्याचे कारणच राहत नाही. खरे म्हणजे भारतीय दर्शनात अनेक मतांचे प्रतिपादन करण्यात आल्यामुळे परमेश्वराची भक्ती करण्याच्या प्रयत्नापेक्षा या वादांच्या सिद्धीसाठी तर्काच्या इमारती उभ्या करण्याची कसरतच अधिक करण्यात शास्त्रकारांचा वेळ गेलेला दिसून येतो. वैदिक शास्त्रकार विविध मतांचा मेळ घालण्याच्या प्रयत्नात यशस्वी होत नाहीत. त्यांच्या या तार्किक युक्तिवादामुळे अनेक भक्तिमार्गियांचा बुद्धिभेद होतो आणि त्यामुळे अनेक भक्तांचा भक्तीचा मार्ग प्रशस्त होण्याऐवजी मतामतांच्या संशय कल्लोळात तो धुंडाळणे अल्पज्ञ भक्तांना शक्य होत नाही. त्यामुळे मतामतांच्या गलबल्यात निश्चयात्मक वैचारिक भूमिका घेऊन भक्तीचा मार्ग सुकर करण्याचे हेतूने स्वामी म्हणतात, ''सकल सामुग्री परित्यजूनी एथचिया व्युत्पत्ती व्युत्पन्ना होवावे. ''महींद्रभट्टासारखे अनेकजण स्वामींच्या मार्गाचे अनुसरण करू लागलेले होते. त्यांना स्वामी पूर्व सामुग्रीच्या संभ्रमास दूर सारण्यासाठी ही सूत्ररूप उपदेश करीत असत. ते म्हणायचे पूर्वग्रहाची निवृत्ती झाल्याशिवाय नवीन विचारांची स्थापना होणे शक्य नसते. म्हणून ते रोकडा प्रश्न विचारीत, ''बिढारावरी काय बिढारू असे?''

म्हणून सर्व पूर्वसंस्कार आणि पूर्वसामुग्री सोडा आणि आम्ही सांगतो ते निश्चयात्मक विचार स्वीकारून आमच्या मार्गाने चला. तुमचा आध्यात्मिक विकास हमखास होईल. या आश्वासनाच्या पूर्तीसाठी साधकाने मात्र आमच्या विचाराबरोबरच आम्ही सांगतो तसा आचारही केलाच पाहिजे, असा त्यांचा आग्रह होता.

'आचरे तयाचा धर्म :' हे त्यांचे उपदेशाचे सूत्र होते. तसेच 'ज्ञानेविण वैराग्य ते काय करावे बापेया' असेही त्यांचे रोखठोक मत होते. वेड्या अडाणी माणसाचे वर्तनही वैराग्यशीलासारखे असू शकते. म्हणून त्याचा उद्धार होईल का? साधकाचा आचार आणि वैराग्य हे विवेकपूर्ण आणि वैचारिक अधिष्ठानावर आधारलेले असावे असा त्यांचा कटाक्ष होता. त्यासाठी त्यांनी एक आचार संहिता आपल्या शिष्यगणांना शिकविली होती.

**विचार विकल्प शून्य होवावे :**

श्रीचक्रधर स्वामी उत्तरापंथे जाण्याच्या पूर्वी बेलापूर येथे आपल्या शिष्यांना सारखे उपदेश करीत होते. एके दिवशी ते म्हणाले की आम्ही उत्तरापंथे निघून

गेल्यानंतर तुम्ही लोक असंन्निधानी कोणता आचार कराल? श्री नागदेवाचार्य हे ऐकून खिन्न झाले. त्यांना स्वामींची उत्तरापंथे जाण्याची इच्छा दुःखदायी वाटली होती. परंतु स्वामींचा तो निश्चय होता. त्यावर नागदेवाचार्य काहीच बोलले नाहीत. पुन्हा स्वामी म्हणाले, तो आचार आम्ही आता सांगतो तो तुम्ही शांत चित्ताने ऐकून घ्या. ही निर्वाणीची सूचना मिळाल्यावर नागदेवाचार्य एकचित्त होऊन ऐकू लागलेत. त्या प्रसंगी स्वामींनी असंन्निधानीचा अनुसरणीय मार्ग सांगितला. त्यावर बरेच प्रवचन केले. ते प्रवचनाचे सूत्र असे होते-

''विकार विकल्प शून्य : स्वभावमात्रे : निरालंबी : देवतास्मरणे जन्म क्षेपीः तयासि परमेश्वरू पुनरपि संबंधु देतीः''

या सूत्रात त्यांनी साधकाचा पूर्ण आचार सांगितलेला आहे. या सूत्रासच 'असतिपरी' असे म्हणतात. या सूत्राचा अर्थ असा सांगतात की साधकाने विकार सोडावा. साधकाने इंद्रियांचे अनुषंगाने निर्माण होणाऱ्या बलवत्तर भोगेच्छांचा सर्वथैव त्याग करावा. रूप, रस, गंध, शब्द आणि स्पर्श या पाचाबरोबर स्त्री-पुरुष संबंधाने निर्माण होणारी बलवत्तर भोगेच्छा विकारजन्यच असते. या सर्व विकारांचे नियमन करण्यात साधकाने यशस्वी व्हावे, ही खरी साधकाच्या साधनेची कसोटी आहे.

विकल्प म्हणजे मनाच्या नानाविध कल्पना! 'जे जसे नाही तसे समजणे' हा विकल्प आहे. जसे परमेश्वर म्हणजे परमऐश्वर्ययुक्त, जो जीवाला अज्ञानमुक्त करतो, बंधमुक्त करतो, तोच अखंड परमानंद देणाऱ्या मोक्षस्थानी घेऊन जाऊ शकतो. त्या परमेश्वराचे मोक्षदातृत्वाचे सामर्थ्य देवीदेवतांचे ठिकाणी नसते म्हणून त्यांना परमेश्वर मानणे हा विकल्प दोष आहे. जसे मुलांना देवी आल्यावर ज्या शेंदरी दैवताकडे आपण मुलांना नेतो तेथेच मोक्ष मागणे हे चूक आहे. म्हणून परमऐश्वर्य युक्त भगवान श्रीकृष्णावतार, श्री दत्तात्रेय प्रभु या पूर्णावतारांची मोक्षाकांक्षी साधकांनी आराधना करावी. ती आराधना ही विकल्प दोषापासून मुक्त असते. असे स्वामी सुचवून गेले.

दुसरे 'शब्द ज्ञानानुपाती वस्तु शून्यो विकल्प' असे महर्षी पतंजलीनी योगसूत्राच्या समाधिपाद ९ मध्ये म्हटलेले आहे. शास्त्रप्रमाणाशिवाय ऐकीव ज्ञानाच्या आधारे एखाद्या गोष्टीवर विश्वास ठेवणे हा विकल्प दोषच आहे. ज्यामुळे जीव नानाविध कल्पना करून भ्रामक कल्पनाविलासात मग्न होतो, ती मनाची

भ्रामक अवस्था ही विकल्पवृत्ती होय. ती सत्य आणि शास्त्रशुद्ध ज्ञानार्जनाने संपुष्टात आणली पाहिजे.

याशिवाय एक महत्त्वपूर्ण विकल्पदोष आपण सतत पोसत असतो. तो म्हणजे काही गोष्टींना आपण पवित्र मानतो. तर काहींना अपवित्र मानतो. जसे सर्व मानवजात शरीरतः आणि आत्मतः एकसारखी असूनही आपण कुणाला ब्राह्मण म्हणून श्रेष्ठ मानतो, क्षत्रिय म्हणून श्रेष्ठ मानतो. आणि इतर जाती वा वर्णातील लोकांना नीच मानतो. हा विकल्प साधकांनी सर्वथैव त्यागला पाहिजे. गाय पवित्र आणि गाढव अपवित्र, मांजर आडवी गेली ते अशुभ आणि मुंगूस समोर आले तर ते शुभ मानणे हे सर्व विकल्पजन्य दोषच आहेत. हे सर्व विकल्प मनातून सर्वथैव दूर सारले पाहिजे. अशा दोषांपासून मुक्त होऊन निर्विकल्प होणे हीच खरी साधकांच्या साधनेसाठी आवश्यक मनोधारणा आहे. ती निर्विकल्पावस्था मिळविणे ही साधकाची पहिली कसोटी आहे. या अवस्थेनंतरच साधकाच्या साधनेला सुरुवात होऊ शकते असा स्वामींचा अभिप्राय आहे. अशी स्वामींची शिकवण आहे.

एक महत्त्वाचा उल्लेख येथे करणे आवश्यक वाटते की संतश्रेष्ठ ज्ञानदेवांनी निर्विकल्प समाधी घेतलेली होती. ती समाधी साधकाची अंतिम अवस्था मानल्या जाते. श्रीचक्रधरस्वामी मात्र ही साधनेची पहिली पायरी मानतात. निर्विकार आणि निर्विकल्प होऊन स्वाभाविक अन् एकांत अवस्थेत जीवन व्यतीत करण्याचा त्यांचा उपदेश साधक भक्तांना मोक्ष मुक्तीची वाट सुकर करणारा आहे. निर्विकार आणि निर्विकल्प होणे ही साधक भक्ताच्या आचाराची पूर्वावस्था आहे आणि पुढे तो भक्तीच्या शक्तीने मोक्षधामास जाण्यासाठी स्वाभाविक जीवन मापन करीत राहावा.त्याने अस्वाभाविकपणे आपली जीवनयात्रा संपवू नये. शरीरास उपास तापासाचे असह्य क्लेश देऊ नये. तसेच इंद्रियसुखासाठी भोगाच्या लालसा तृप्त करीत विलासी जीवन जगू नये. स्वामी म्हणतात, "शरीरास आहार द्यावा. इंद्रियास न द्यावा." शरीर पोषणास आवश्यक तो माफक आहार देत राहावा. परंतु सुखोपभोगाची इंद्रियाची भूक भागविण्यासाठी आहार देऊ नये. भोगी सदैव रोगी असतो. म्हणून भोगेच्छा पूर्ण करण्यासाठी आहार आणि विहाराचे स्वैरसेवन करू नये. स्वाभाविक जगणे शक्य होईल असा आहार विहार ठेवून एकांत जीवन क्षेपावे असा स्वामींचा उपदेश होता. या त्यांचे सिद्धांताला 'असतिपरी' असे

म्हणतात.

ही साधना करण्यासाठी 'निरालंबी' वृत्तीने जन्मक्षेपण्याची आज्ञा देऊन स्वामी साधकाला अभय देतात की असा जन्म क्षेपाल तर निश्चितच परमेश्वर प्राप्ती होईल. तीच मुक्तीची अवस्था असेल तोच खरा मोक्ष असेल.

**साधन त्रयी : ज्ञान-भक्ति-वैराग्य**

श्रीचक्रधर स्वामी म्हणतात की ज्ञान हे वैराग्याचे साधन आहे. ज्ञान म्हणजे 'जे जसे आहे तसे जाणणे!'' ज्ञानाची अशी सरळ सोपी व्याख्या करून स्वामी म्हणतात, दृष्ट आणि अदृष्ट सृष्टीतील अनेक कल्पनासंबंधी आपण चुकीचे ग्रह करून घेत असतो. ते चुकीचे ग्रह यथातथ्य ज्ञानाने दूर होतात. कधी कधी शिष्यासोबत गुरूसुद्धा चुकीची माहिती देतो. त्याद्वारे शिष्यांची दिशाभूल करून गुरूच त्यास अधिक अज्ञानाचे गर्तेत नेत असतो. अशाच एका गुरूची माहिती देण्यासाठी स्वामी एक दृष्टांत देतात :

''एका गुरूचे दोन शिष्य बाहेर फिरायला गेले होते. त्यांनी यापूर्वी न पाहिलेला एक प्राणी त्यांना दिसला. ते एक डुकराचे पिलू होते. त्याकडे पाहून एक म्हणाला,'हा रोड झालेला हत्ती आहे.' दुसरा म्हणाला,''नाही! हा पुष्ट झालेला उंदीर आहे.'' दोघांचा वाद तुटेना. म्हणून त्यांनी ते पिलू धरून गुरूसमोर ठेवून एकाने सांगितले की हा रोडावलेला हत्ती आहे. तर दुसरा म्हणाला हा पुष्ट झालेला उंदीर आहे. त्यावर गुरू जोरजोराने हसून म्हणाला,''अरे मूर्खांनो! हा हत्तीही नव्हे आणि उंदीर तर नव्हेच नव्हे, हा आहे, चक्रवाक पक्षी!''

असे गुरू जगात कमी नाहीत. ते ज्ञानाच्या नावावर शिष्यांना अज्ञानाचेच दान करीत दिशाभूल करीत असतात. त्यामुळे अनेक लोक संप्रदाय परंपरेने अधिकाधिक अज्ञानाची जोपासना करीत जातात आणि ज्ञानाचे नावावर अज्ञान पसरविल्या जाते. असे होऊ नये म्हणून खरे ज्ञान,'जे जैसे असे तैसे जाणणे' याचा अभ्यास झाला पाहिजे. अशा यथातथ्य ज्ञानोपासनेतूनच वैराग्य उपजते, असे श्रीचक्रधर स्वामी सांगत असत.

हे जग नश्वर आहे. यातले सुखोपभोग फसवे असून त्यामागे धावणारे लोक सुखाऐवजी दुःखच पदरी पाडून घेतात. म्हणून हे दृश्य जगत सर्वार्थाने फसवे आहे. ते भ्रामक असून स्वप्नवत आहे. याची जाणीव होणे हे खरे ज्ञान होय. हे वास्तवाचे भान खऱ्या ज्ञानाने येत असते. स्वामी म्हणतात,''जीवन म्हणजे दी

स्वप्न की गा : हे साच म्हणून घेओ नये अन् लटके म्हणौन सोडो नये.'' ही या भ्रामक जगात जगण्याची दृष्टी देणारे ज्ञान स्वामींनी आपल्या शिष्यांना समजावून दिले. त्यातूनच श्री नागदेवासारखे वीतराग वैरागी तयार झालेत. महींद्रभट्टासारखे गर्भश्रीमंत अन् महापंडित शिळ्या भाकरीचे तुकडे मागून वैराग्यपूर्ण जीवन जगत जगत मोक्षगामी झालेत. या अन् अशा अनेक लोकांना मोक्षमार्गाकडे नेणारे ज्ञान स्वामींनी सतत प्रवचन आणि निरुपणाद्वारे दिले. ही त्यांची अखंड ज्ञानयात्रा सुरू होती. त्यांची प्रवचन ऐकणारे किती आहेत? कोण कोण आहेत? कोणत्या प्रज्ञेचे आहेत? हे न पाहता ते प्रवचने करीत असत. एकदा समोर कुणीच नव्हते. एक दोन बाया बसलेल्या होत्या. स्वामी मात्र निरुपण करीत होते. त्या बाया म्हणाल्या, 'बाबा येथे समजून घेण्याची पात्रता असणारा कुणीच नाही. आम्हांला हे तत्त्वज्ञान समजू शकत नाही. रात्र बरीच झाली आहे. निरुपण थांबवावे जी : त्यावर आर्तभक्तांना वाडोवाडी, गावोगावी शोधत शोधत फिरणारा हा 'ज्ञानदाता' म्हणाला, ''बाई! आताचे ते जसे ऐकता तसे केवळ ऐकून घ्या. ही ज्ञानाची शिदोरी तुम्हांस पुढे उपयोगी पडेल.'' त्याच संदर्भात पुढे स्वामी म्हणाले, ''आमची ज्ञानदानाची ही अनावर ऊर्मी थांबणारी नाही. आमच्या समोर श्रोता असो वा नसो, या समोरच्या खांबास निमित्त करून आम्ही सांगत राहू.'' म्हणून ते ज्या ज्या ठिकाणी बोलले त्या त्या ठिकाणी असलेले ते खांब, त्या भिंती, त्या जागा आजही ज्ञान संक्रमण करण्यास समर्थ आहेत. म्हणूनच तेथे भावभक्तीने वंदन करणाऱ्या भक्तांचे मनात आणि हृदयात 'ज्ञानोदय' करण्याचे सामर्थ्य तेथील अणुरेणूत अन् कणाकणात भरलेले आहे. ती ज्ञानऊर्जा घेण्यासाठीच महानुभाव त्या ओट्या-गोट्यांना वंदन करतात. ही भक्तीच त्यांना ज्ञानसंक्रमण करून मोक्ष मार्गाची त्यांची वाट प्रशस्त करीत असते.

### स्वामींचे आध्यात्मिक क्षेत्रातील अभूतपूर्व क्रांतिकार्य

गोदावरीच्या उभय तीरावरून, गावागावात स्वामी फिरत होते. दुःख हे नेहमी झोपडीत राहते. म्हणून ते गावो-गावी, वाडोवाडी फिरून भवतापदग्ध जीवांचा शोध घेत असत. त्या असंख्य जीवांचे दुःख 'निरपौन' काढण्यासाठी त्यांची अखंड ज्ञानयात्रा सुरू होती. ते म्हणायचे, 'मी आर्त जीवांचे उद्धाराकरिता त्यांना 'वाडोवाडी गिवसत गिवसत फिरेल.' दीनदलितांच्या वस्तीतून ते त्यांची दुःखे दूर करण्यासाठी जात असत. त्यामुळे पतितोद्धारक म्हणून महाराष्ट्राभर गाजत होते.

त्यांना धर्मक्षेत्रातून जात-पात आणि उच्चनीचतेच्या भावनांना हद्दपार करावयाचे होते. आपल्या ब्राह्मण शिष्यपरिवारास ते सांगायचे की ''तुमचा ब्राह्मणत्वाचा अभिमान त्यागा. 'सर्वाधमत्व ब्राह्मणत्व' हे त्यांचे आचारसूत्र ज्यांना मंजूर असेल त्याच ब्राह्मण शिष्यांची मांदी त्यांच्याभोवती गोळा झालेली होती.

आता या स्वामींच्या शिष्यमंडळात नागदेवाचार्य, बाईसा, महदाईसा, आबाईसा, चांगदेव भट, इंद्रभट ही मंडळी सामील झालेली होती. हे सर्वजण फिरत फिरत पुनश्च पैठणला आले.तेव्हा त्यांच्या शिष्यपरिवारात पैठणचे गदोनायक भांडारी हे सहभागी झाले होते व पैठणचे नगर प्रमुख मायताहरी नायक हेही आले होते.

यावेळी पैठणच्या मुक्कामात स्वामींचे क्रांतिकार्य अधिकच प्रभावी झालेले होते. बाहेरून येणाऱ्या शिष्यगणांनी स्वामींचा आश्रम भरलेला असायचा. पैठण नगराचे प्रमुख श्री मायताहरी नाईक यांनी स्वामींची सन्मानार्थ मोठी मिरवणूक काढली होती. त्यामुळे स्वामींचे माहात्म्य पैठण नगरात अधिकच वाढीस लागले होते.

ही सन्मानाची वागणूक स्वामींचे कार्याकडे दूषित दृष्टीने पाहणाऱ्या ब्रह्मसानु, महदाश्रमासारख्या सनातनी विचारांच्या लोकांना आवडणे शक्य नव्हते. स्वामींचा सन्मान म्हणजे स्वामींच्या क्रांतिकारी विचारांचा सन्मान होता. तो सन्मान या विरोधकांच्या मनाला बोचणारा होता. तो त्यांना रूढिवादी कर्मठ मतांचा उच्छेद करणारा वाटत होता.

## यंत्रासनावर पूजा : कट फसला

स्वामींचे क्रांतिकारी विचार जनमानसात मान्यता पावू लागले तर मग या देशातून सनातन धर्ममतांचे उच्चाटन होईल. या भयगंडाने पछाडलेले पैठणचे सनातनी धास्तावले होते. त्यात मायता हरीनाईकासारखा नगर प्रमुख, राजा महादेवरायाचा मित्र अन् भांडारी गदोनायक यांसारखे मातब्बर लोक स्वामींच्या भक्तगणात सामील झाल्यामुळे तर ही भीती अधिकच वाढली होती.

म्हणून या विचारांच्या प्रसारापासून तथाकथित सनातन धर्मपरंपरेचे रक्षण करण्यासाठी स्वामींनाच संपविण्याचा विचार काही विकृत धर्ममार्तंडाच्या मनात आला. वेरूळचा विषप्रयोग फसल्यामुळे येथे मंत्रतंत्राच्या साहाय्याने एक यंत्रासन रचून त्यात स्वामींचा घात करण्याचा घाट घातला गेला.

स्वामींना पूजनाच्या निमित्ताने बोलविण्यात आले. स्वामींना हा कट आहे हे जाणवले होते. स्वामींनी एका उच्च यंत्रासनावर आरूढ होण्यापूर्वीच त्या यंत्रासनास उलटे केले आणि नंतरच ते त्या आसनाच्या पायऱ्या चढून आसनावर आरूढ झाले. स्वामींचा घात करण्यासाठी रचलेल्या आसनावर ते सुखेनैव आरूढ झालेले पाहून कट रचणारे खजील झालेले होते. परंतु त्यांना त्या आसनावर सुखरूप आरूढ झालेल्या स्वामींची पूजा करण्याचे नाट्य वठविणे भाग पडले.

## हा विरोध कशासाठी?

स्वामींचा हा एवढा तीव्र विरोध करण्याची कारणे स्पष्ट होती. ते जातिपातीच्या बंधांना तोडून एकजिनसी मानवसमाज निर्माण करण्याचा विचार मांडीत होते.

स्वामी म्हणायचे, या जगातील माणसांनी जातिपातीच्या भिंती उभारून परस्परांत बरेच दुरावे निर्माण करून ठेवलेले आहेत. ते दुरावे दूर केल्याशिवाय समाजव्यवस्थेतील विकृती जाणार नाही. परंतु केवळ वरवरची जातिनिर्मूलनाची चळवळ करून खोलवर रुजलेला उच्चनीच भावाचा कुसंस्कार नष्ट होणार नाही, हे स्वामी जाणत होते. म्हणून ते म्हणत असत की वर्णभेद किंवा जातिप्रथा नष्ट करावयाची असेल तर सर्व लोकांच्या मनात खोलवर रुजलेले अज्ञ समजुतींचे लेप नाहिसे झाले पाहिजेत. ते नष्ट करण्यासाठी माणसांच्या मनातील उच्चनीचतेचा विकल्प गेलाच पाहिजे. त्याशिवाय तुम्ही मोक्षमार्गाचे पथिक होऊच शकत नाही, अशी ही स्वामींची वैचारिक भूमिका ज्यांना पटली त्या ब्राह्मण शिष्यांनी जातिपातीची बंधने झुगारून देऊन कठोर वर्तन सुरू केले होते.

स्वामी केवळ माणसातलाच श्रेष्ठ कनिष्ठ भाव दूर करा असे सांगत नसत तर ते यच्चयावत सृष्टीतील प्राण्यांकडेही समदृष्टीने पाहत असत. ते म्हणायचे,

पवित्र म्हणजे गाय : अपवित्र म्हणजे सुने : एवं पशु देहचि : आन अमंगळ भक्षकु : परि कैसी कल्पना करी :

या सृष्टीतील सर्वच प्राणिमात्रांबद्दलची ही समदृष्टी देणारा स्वामींचा उपदेश असा व्यापक व विश्वात्मक होता. त्यांना सर्व प्रकारच्या विटाळाच्या कल्पनांचाही विकल्पजन्य आचार निषिद्ध वाटत होता. ते म्हणायचे,

''विटाळ म्हणजे मातंगाचा तथा ऋतुमती स्त्रीचा मानी : आन निरयदेही स्थावर शिंदीचा वृक्ष सदा पाणी वाहे : अथवा मलमूत्र वाहती : अमंगळ द्वारे

असति : तयाचा विटाळ न मानी :''

ही वैचारिक विकृतीवरची त्यांची मीमांसा, स्पृश्यास्पृश्य भावनेवरचा, कठोर प्रहारच होती.

ब्राह्मणाबरोबरच तथाकथित शूद्र वर्णियांना मोक्षप्राप्तीचा अधिकार असल्याचे सर्वज्ञ श्रीचक्रधर स्वामींनी सतत प्रतिपादिले. पारंपारिक जीवन मूल्यांच्या अन्याय्य चरकात पिळून काढल्या जाणाऱ्या तसेच इहलोकीच्या आणि पारलौकिक सुखप्राप्तीच्या मार्गातील अनेक दुखणी असलेल्या शूद्र समाजालाही मोक्षाचा अधिकार आहे, हे ठणकावून सांगण्याची गरज आजच्यापेक्षाही त्या काळात किती होती हे सांगण्याची गरज नाही. स्वामींच्या या तात्त्विक भूमिकेचे समर्थन करायला, त्यांचे आचरण करायला ब्राह्मण समाजातील बरेच शिष्य पुढे आले असले तरीही उर्वरित समाजात याच्या किती कठोर प्रतिक्रिया उमटल्या असतील याची कल्पनाच केलेली बरी.

## स्त्रियांच्या मोक्षाधिकाराचे सक्रिय समर्थन

स्वामींच्या काळात स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रश्न अत्यंत कठीण होता. ''पतिर्एको गुरू स्त्रीणां' किंवा 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हतिः'' ही मनूची कठोर आज्ञा खुद्द ब्राह्मण विद्वानांना जन्म देणाऱ्या मातांनाही ज्ञानाधिकार आणि मोक्षाधिकार नाकारणारी क्रूर चेष्टा होती. ब्राह्मणस्त्रियांची ही अवस्था होती तर शूद्र समजल्या जाणाऱ्या स्त्रियांची किती कठीण अवस्था असेल? सतत काम करणे आणि अज्ञानांधःकारात मरेपर्यंत जगणे, एवढेच दुर्दैव त्यांच्या भाली लिहिलेले होते. अनेक ब्राह्मण बालविधवा केशवपन करून घराच्या आतल्या माजघराच्या अंधारात राहून पशुहूनही निपट्टर जीवन जगत असत. असे दुर्दैवी जीवन जगण्याची धार्मिक सक्ती त्यांचे नशिबी या स्मृतिकारांनी लिहिली होती. ही धर्माची विकृती आणि सामाजिक क्रूरता स्वामींच्या हृदयाला दुखविणारी होती. म्हणून त्यांनी याही विकृतीविरूद्ध बंड पुकारून त्यांनी पुरुष जातीला प्रश्न विचारला होता-

''पुरुषाचे जीव अन् स्त्रियांच्या काय जीवलीया?''

स्वामींचे या प्रश्नाचे उत्तरातच स्त्री-पुरुष समानतेची बीजे आहेत.

स्त्रियांना विद्येचा अधिकार नाकारणाऱ्या ब्राह्मण समाजाला स्वामी विचारायचे की, ''तुमच्या वेदऋचा लिहिणाऱ्या गार्गी-मैत्रेयी यांना ज्ञानाधिकार होता, तसाच त्यांच्या वंशात जन्मलेल्या स्त्रियांनाही आहे. त्यांच्या शिक्षणाचा

आणि ज्ञानार्जनाचा अधिकार हा त्यांचा जन्मसिद्ध अधिकारच आहे, असे सांगणारा थोरात्मा अखिल हिंदुस्थानात हा पहिलाच होता. त्यांनी स्त्री-पुरुषांची समानता दाखवून देऊन त्यांच्या ज्ञानाधिकाराची अवरुद्ध वाट मोकळी करून दिली. स्त्रियांना मोक्षाधिकार सांगणारा धर्मक्षेत्रातला हा पहिला धर्मज्ञ होता. ही स्वामींची महानता आजच्या जगाला पटते. परंतु स्वामींच्या समकालीन धर्ममार्तंडाना ती पटणे आणि पचविणे शक्य नव्हते. त्यांनी स्वामींच्या या स्त्री उद्धाराला बदनाम करण्यासाठी त्यांच्यावर अनेक लांच्छने लावून आपला विरोध नोंदविला होता. स्वामींनी अशा विरोधाची तमा बाळगली नाही. गीतेच्या वचनात 'स्त्री आणि शूद्र यांना धर्म आणि मोक्षाच्या अधिकाराचे समर्थन केलेले आहे. त्याचप्रकारचे समर्थन स्वामी करीत होते. ते म्हणायचे,"गार्गीमैत्रेयी लोपामुद्रा या स्त्रियांनी वैदिक ऋषिकुळात जन्म घेऊन वेदवाङ्‌मयात मोलाची भर घातली आहे. त्यांना वेदमंत्र लिहिण्याइतकी ज्ञानप्राप्ती करण्याचा अधिकार देणाऱ्या वैदिक ऋषींची कृती दुर्लक्षित करून मनूसारख्या उत्तरकालीन स्मृतिकारांनी स्त्री जातीवर खूपच अन्याय्य बंधने घातलेली आहेत. आपल्या माताभगिनींना तुम्ही गुलामासारखे घरात कोंडून ठेवता. त्यांचा तो अंधारकोठडीतला काळ सुसह्य व्हावा इतकाही ज्ञानार्जनाचा अधिकार त्यांना नाकारता? मोक्ष प्राप्तीसाठीचा त्यांचा भक्तीचा अधिकारही तुम्ही त्यांना नाकारता? हे धर्मबाह्य आहे. गार्गी-मैत्रेयी या वैदिक भगिनींच्या ऋचाही वाचण्याचा वा अभ्यासण्यांचा त्यांचा अधिकार अर्वाचीन स्मृतिकारांनी नाकारावा ही वैदिक धर्माची क्रूर थट्टा आहे. असे स्पष्ट आणि परखड विचार स्वामींनी मांडले. ते कर्मठांना पटणे शक्यच नव्हते. त्यामुळे 'हे आमचा मार्ग उच्छेदीती' ही त्यांची ओरड सारखी चालूच होती.

### धर्मग्लानीची परमावधी

या काळात भारतभर सर्वसामान्य जनांनी धर्माला एका विकृत वळणावर नेले होते. इहलोकीच्या सुखासाठी, दुःख आणि संकटांच्या निरसनासाठी वैदिक काळात यज्ञयाग आणि पशुबळी देण्याचा एक हिंसाप्रधान तथाकथित 'वैदिकधर्म' उदयास आला होता. त्यात अनेक प्रकारच्या पशूंचे बळी देऊन देवतांना प्रसन्न करून घेण्याचे कर्मकांड तयार करण्यात आले होते. परंतु हे सर्व हिंसाप्रधान यज्ञयाग द्विवर्णीयापुरतेच मर्यादित होते. वैश्य आणि शूद्रांना या यज्ञासाठी अपात्र मानण्यात आले होते. त्यामुळे आपल्या दुःखाची निवृत्ती आणि ऐहिक सुखप्राप्तीसाठी

वैश्य-शूद्रादी बहुजनांनी आपल्याकरिता यज्ञसदृश देवतापूजनाचा हिंसाप्रधान धर्म तयार केला होता. त्यांची दैवते बनविली होती. त्यामुळे विविध सुखांच्या प्राप्तीसाठी कल्पित दैवतांची संख्या वाढलेली होती. त्यांना प्रसन्न करून घेण्यासाठी पशुबळी देण्याचे एक नवेच कर्मकांड अनेक 'जाणत्या' जोग्यांनी तयार केलेले होते. त्यांनी काही मंत्रही सिद्ध केले होते. या सर्व विधींचे तंत्र शतकानुशतके तयार होत होते. या अनेकाविध तंत्रात पंचमकारांच्या पूजनाचे माहात्म्य अधिकच होते. मदिरा, मदिराक्षी, मांस, मच्छी यांच्या उपाहाराचे निर्लज्ज माहात्म्य या तंत्र मार्गियांनी गाईलेले होते. त्यांच्या पूजातंत्रात मैथुनादि घृणित क्रियांचाही समावेश झालेला होता. हा आणि असा हिंसाप्रधान पूजा-विधी सर्व देशभर धर्माच्या नावावर सुरू होता. या तंत्रमार्गात नवपरिणत बुद्ध आणि जैन धर्मही सहभागी झालेले होते. भागवत धर्माची शाखा मानल्या जाणाऱ्या वैष्णव संप्रदायातसुद्धा 'वैखानस' तंत्रासारखे तंत्रविधी घुसलेले होते.

ही सर्व धर्मांच्या नावावर चालणारी विकृत व हिंसाप्रधान देवताभक्ती देशभर सुरू होती. वैदिकत्वाचा तुरा मिरविणारे 'वेदांती' आपल्या 'अद्वैत' तत्त्वज्ञानाने ही धर्मविकृती दूर करू शकलेले नव्हते. उलट कोणत्याही दैवतांची पूजा करा ते सर्वपूजन केशवाप्रती होते, असे म्हणणारे अद्वैतवादी एका परीने या बहुदैवतांच्या वादाला खतपाणीच घालीत होते. त्यामुळे या देशात धर्माच्या नावावर बराच गोंधळ सुरू होता. धर्मक्षेत्रातील या अवस्थेचा आपल्या स्वार्थासाठी लाभ करून घेण्याचे कार्य बरेच भोंदू लोक करीत होते. वैदिक यज्ञयागाचा लाभ घेण्याचा 'याज्ञिक' पुरोहित प्रयत्न करीत तर बहुजनांच्या धार्मिक भोळेपणाचा लाभ अनेक चतुर भोंदू साधू आणि जाणते लोक घेत असत. अशी ही धर्मक्षेत्रातील अवस्था संपविणे समाजस्वास्थ्याच्या दृष्टीने आवश्यक होते. कारण सर्व समाज हा धर्माधिष्ठित होता. समाजाच्या हिताचे कोणतेही कार्य धर्मसुधारणे शिवाय होत नसते म्हणून श्रीचक्रधर स्वामींना सामान्य जनांच्या मनात खोलवर रुजलेली हिंसाप्रधान देवताभक्तीची मुळे सकंदी उपटून तेथे ज्ञानयुक्त अहिंसाप्रधान भक्तिमार्गाची बीजे पेरावयाची होती. त्यासाठी श्रीचक्रधरांनी इहवादी देवताभक्तीऐवजी परवादी परमेश्वर भक्तीचा साग्रह पुरस्कार केला होता. गीतेत आणि भागवत संप्रदायात परंपरेने ज्ञानयुक्त भक्तीचे प्रतिपादन केलेले आहे. सनातन भागवत धर्म हा भक्तिमार्गी आहे. तसाच श्रीचक्रधरांचा नवपरिणत भक्तिमार्ग हा

परमेश्वराची अनन्य भक्ती शिकविणारा आहे. हा मार्ग धर्माच्या नावावर होणारी हिंसा निषिद्ध मानतो. मग ती हिंसा वैदिक कर्मकांडातील याज्ञिक हिंसा असो की बहुजनांच्या क्षुद्रफलदात्या देवतांच्या भक्तीपायी करण्यात येणारी प्राण्यांची बळी प्रथा असो, बहिरमच्या शिखरावर देण्यात येणाऱ्या बळींची हिंसा आणि तुळजापूरच्या मायभवानीसमोर कापल्या जाणाऱ्या बोकडांची हिंसा अमान्य करणारा श्रीचक्रधरांचा भक्तिमार्ग होता. त्यामुळे स्वामींचा हा नवा धर्म वैदिक याज्ञिकांना आणि भवानीच्या हिंसक भक्तांना आवडणारा नव्हता. म्हणून स्वामींच्या भक्तिमार्गाचा दोन्हीपक्षी विरोध होणे स्वाभाविकच होते. हिंसक पूजापद्धतीच्या विरुद्धचे ते बंड होते. परंतु ते देवताभक्तीच्या मात्र विरुद्ध नव्हते. उलट स्वामी देवतांचे सनातन अस्तित्व मान्य करीत होते. अद्वैती विविध देवतांचे अस्तित्व तत्त्वतः नाकारतात. स्वामींनी देवता हा स्वतंत्र पदार्थ मान्य करून, त्यांच्या सामर्थ्यालाही मान्य केलेले आहे. अद्वैतात एकमेव 'ब्रह्म' मानले आहे, त्यामुळे तेही तेहतीस कोटी देवता या पौराणिक काळातील कल्पित मानतात. तसे स्वामींनी मानले नाही. तरीही स्वामींना देवता विरोधक मानून तत्कालीन कर्मठ धार्मिकांनी स्वामींचा विरोध करणे सुरू केले होते.

## वैदिक श्रुति-स्मृतींचे प्रामाण्य अमान्य

श्रीचक्रधर स्वामींचे काळांत अनेक धर्ममते प्रचलित होती. वैदिक म्हणविणारे शंकाराचार्य आणि रामानुज परस्परविरोधी धर्ममते मांडत होते. द्वैत आणि अद्वैताचे मतांना गीता, उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रांतील आधार देऊन दोन्ही परस्परविरोधी मते मांडण्यात येत होती. शंकराचार्यावर वल्लभाचार्य आणि रामानुजाचार्य कठोर टीका करीत. त्यांच्या अद्वैताचे खंडन करीत. शांकरीय अद्वैतवादी रामानुजाच्या द्वैतवादी मतांचे खंडन करीत. दोन्ही पक्ष गीता, उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रें या प्रस्थानत्रयीचाच आधार घेत असत. दोन परस्पर टोकांची मते एकाच आधाराने खोडून काढण्याची ही जगावेगळी रीत होती.

तसेच स्मृतींच्या वचनांतही मेळ नव्हता. एकीकडे संन्याशांना 'चातुर्वर्ण्यात् चरेत् भिक्षम्' अशी आज्ञा देणारी मनुस्मृती अस्पृश्यांच्या साध्या स्पर्शालाही कठोर दंडित करण्याची शिक्षा सांगत होती. त्यामुळे हे सर्व शास्त्र लोकमानसात संभ्रम निर्माण करणारे आहे. म्हणून ते सोडून एक निश्चयात्मक स्वतंत्र चिंतन स्वामींनी धार्मिक आचारासाठी सांगितले होते. त्यांना धार्मिक वैचारिक संभ्रमाची अवस्था

दूर करावयाची होती. म्हणून त्यांनी आपल्या शिष्यांना स्पष्टपणे सांगितले होते की, ''सकल सामुग्री परित्यजूनी एथचिया व्युत्पत्ती व्युत्पन्ना होवावे.'' ही स्वामींची आज्ञा वेदप्रामाण्य आणि परंपरागत स्मृतींचे प्रामाण्य नाकारणारी आहे, म्हणून कर्मठ धार्मिक जनांनी स्वामींचा विरोध सुरू केला होता.

**धर्मक्षेत्रात पंगती प्रपंच नाही.**

श्रीचक्रधर स्वामींचा जातीची बंधने तोडण्याचा उपदेश होता. धर्मक्षेत्रात जातिगत उच्चनीचता त्यांना मान्य नव्हती. धर्ममंदिरात ब्राह्मण आणि चर्मकार त्यांनी एकाच पंगतीत बसविले होते. सरालेकर ब्राह्मण आणि चांभार गोंदयाचा दाकोबासोबत त्यांनी राजमठात सहभोजन घेतले होते. संगत एक आणि पंगत दोन अशी त्यांची वागण्याची पद्धती नव्हती.

अद्वैत विचार हा जातिगत भेदाभेदाचे खरे म्हणजे विरोधी आहे. सर्वाभूती ब्रह्म पाहणारांनी ब्राह्मण आणि अंत्यजात एकता पाहायला हवी होती. परंतु तसे होत नव्हते. सर्वच कर्मठ वैदिक हे सारखेच जातीय भेदाभेद पोसणारे होते. अद्वैती शांकरीय आणि द्वैती रामानुजाचार्य, मध्वाचार्य,वल्लभाचार्य आणि निंबार्काचार्य हे चारही आचार्य आपला धर्म सोवळ्यात गुंडाळून बसले होते. परंतु श्रीचक्रधर स्वामींनी आपल्या शिष्यांना घर न निवडता भिक्षा करायला सांगितली होती. जातीच्या उच्चतेचे सोवळे सोडायला सांगितले होते. म्हणूनच त्यांचा शिष्य संप्रदाय हा जातिगत भेद मानीत नव्हता. संगतीला आणि पंगतीला ते सारखेच जवळ असायचे. ते सर्वांना सारख्याच रांगेत बसवावयाचे.

ही गोष्ट कर्मठ सनातनी वैदिकांना रुचणारी नव्हती, त्यामुळे पैठणच्या धर्ममार्तंडांचा स्वामींच्या धर्मप्रवर्तनाच्या कार्याला विरोध होऊ लागला होता.

महदाश्रम आणि ब्रह्मसानु हे राजाचे धर्मगुरू आणि राजपुरोहित होते. ते सारखे म्हणत की,''हे आमचा धर्म उच्छेदीती!'' त्यांना हेमाद्री पंडितासारख्या राजपुरुषाचे पाठबळ मिळाले. तोही अनेकदा म्हणाला होता की 'हे आमचा मार्ग उच्छेदीती.' हेमाद्री हा कट्टर वर्णव्यवस्थावादी होता. तो वैदिक कर्मकांडाचा निष्ठावंत पुरस्कर्ता होता. त्याने चतुर्वर्गचिंतामणीसारखा अनेक व्रतवैकल्यांची माहिती देणारा स्वतंत्र ग्रंथ लिहिला होता. असा हा कट्टर वैदिक कर्मकांडाचा पुरस्कर्ता वजनदार राजपुरुष होता. पुढे तर तो रामदेव राजाचा पंतप्रधान झाला. त्यावेळी त्याने स्वामींच्या विरोधाची मोहीमच राबविली. स्वामींच्या धर्मसुधारणेच्या

मूलभूत गोष्टीचे विकृतीकरण करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

**स्वामींचे परिवर्तन कार्य बदनाम केले.**

स्वामी कर्मकांडाला विरोध करीत होते. त्यामुळे त्यांना वेदविरोधी मानण्यात आले. ते धर्मबाह्य उपदेश करतात, अशी टीका करण्यात येऊ लागली. स्वामींना देवी दैवतासमोरची पशुहिंसा सर्वथैव त्याज्य वाटत होती. तशीच त्यांना याज्ञिक हिंसा सुद्धा त्याज्य वाटत होती. त्यामुळे हे आपल्या सनातन धर्माच्या विरुद्ध बंड करताहेत, असा त्यांच्यावर आरोप करण्यात येऊ लागला होता.

स्वामी क्षुद्र देवी दैवताच्या समोर इष्ट प्राप्तीसाठी बळी देण्याच्या हिंसेलाही निषिद्ध मानीत होते. धर्मबाह्य मानीत होते. त्यामुळे ते धर्मविरोधक आहेत असाही त्यांच्यावर सर्वसामान्य भोळ्या भाविकांच्यात बुद्धिभेद करणारा आरोप ठेवण्यात येत होता. वास्तविक स्वामी देवतांच्या भक्तीच्या विरोधी नव्हते. तर त्यातील हिंसक विकृतीच्या विरोधी होते. देवता आणि त्यांचे सामर्थ्य त्यांनी मान्यच केले होते. परंतु त्यासाठी करण्यात येणारा तांत्रिक विधी त्यांना त्याज्य वाटत होता. स्वामींची ही भूमिका समजावून घेतली गेली नाही.

स्वामींना परस्परविरोधी विविध वैदिक श्रुती आणि उत्तरकालीन स्मृतींनी निर्माण करून ठेविलेला धार्मिक आचारातील संभ्रम दूर करायचा होता. त्यासाठी ते म्हणाले होते की,'ही सर्व जुनी परस्परविरोधी विचार सांगणारी सामुग्री सोडा व मी सांगतो ती निश्चयात्मक विचार आणि आचार यांची पद्धती स्वीकारा. त्यामुळे भोळ्या भाविकांची धार्मिक संभ्रमावस्था संपेल व धर्मक्षेत्रात एक सुगठित सुसंगत नवा विचार येईल. हा स्वामींचा विचारही टीकेस पात्र ठरविण्यात आला. ते वेद विरोधी आहेत. ते स्मृतिविरोधी आहेत. त्यामुळे त्यांचे धर्मबाह्य विचार कुणी ऐकू नयेत. असाही प्रचार सतत करण्यात येऊ लागला. तो वैचारिक संघर्ष हेमाद्रीच्या काळापासून आजपर्यंतच्या काळापर्यंत टिकला व तो अजूनही सुरूच आहे. स्वामी आणि त्यांचा पंथ सनातन धर्मविरोधी आहे असे आजपर्यंतही सांगण्यात येते.

श्रीचक्रधर स्वामींनी स्त्रियांच्या ज्ञानार्जनाच्या अधिकाराचा निर्भय पुरस्कार केला. त्यांना पुरुषाइतकाच धर्मक्षेत्रात अधिकार आहे. त्या 'मोक्षाच्याही' अधिकारी आहेत. हे धैर्याने सांगून स्त्री साध्वींना आपल्या शिष्य संप्रदायात सहभागी करून घेतले. ही स्त्री उद्धाराची त्यांची चळवळ, स्त्री-शिक्षणाची त्यांची तळमळ, स्त्री-पुरुषांच्या समानतेचा त्यांचा विचार आजच्या काळाने मान्य केला आहे. परंतु

त्याकाळात तो विचार सनातनी लोकांना पटण्यासारखा नव्हता. तो त्यांच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविण्यासाठी हत्यार म्हणून वापरण्याचे दुष्कर्म हेमाद्री आणि त्यांच्या सहचरांनी केले.

तथाकथित शूद्रांना शूद्र समजणे क्षुद्रपणाचे आहे. सर्व मानवजात समान स्तरावरची आहे कारण आपण सर्व 'अच्युत गोत्रीय आहोत,' सर्वच एका गोत्राचे असल्यामुळे 'तुम्हा परस्परे परमप्रीती होवावी', असे स्वामींचे उपदेशाचे सार होते. आज जातिपातीचे, उच्चनीचतेचे विचार आणि स्पृश्यास्पृश्यभेद बेकायदा ठरलेला आहे. परंतु त्या काळात स्वामींचा हा क्रांतिकारी विचार 'जैसे थे' स्थितिवादी कर्मठ समाज़ाला पटणे शक्यच नव्हते.

असे हे स्वामींचे क्रांतिकारी विचार त्यावेळी विरोधाच्या वादळात सापडले होते. तरी आज त्या सर्व विचारांचा जय झालेला आहे.

### लोकभाषेला धर्मभाषेचा सन्मान

श्रीचक्रधर स्वामींचा एक अभूतपूर्व क्रांतिकारी निर्णय असा होता की धर्मशास्त्र हे लोकभाषेतून सांगितले गेले पाहिजे. म्हणून त्यांनी मराठी भाषेला 'देव वाणी' म्हणून गौरविलेले होते. आपल्या तत्त्वदर्शनाच्या प्रतिपादनासाठी त्यांनी मराठी भाषेचाच अंगीकार केला होता. ही गोष्टसुद्धा धार्मिक कट्टरवादी कर्मठांना रुचणारी नव्हती. धर्म आणि तत्त्वज्ञान शिकविण्यासाठी संस्कृत हीच भाषा वापरली पाहिजे असा सनातन दंडक होता. परंतु त्यामुळे ९५% बहुजन समाज धर्म आणि त्याचे तत्त्वज्ञान यापासून वंचित राहत होता. म्हणून स्वामींनी लोकभाषेलाच धर्मभाषेचा सन्मान दिला. हे कर्मठांना रूचले नाही. तरी स्वामींनी हा आपला निर्णय बदलला नाही. तो निर्णय क्रांतिकारी होता. तोही कर्मठांच्या टीकेचे लक्ष बनला. स्वामींना मृत्यूदंड देण्याची राजाज्ञा देण्याचा घाट घातला गेला होता. राजा रामदेव हा 'निपरवस' होता. त्यामुळे तो हेंमाद्रीच्या कटात सहभागी होणे शक्य झाले.

### सत्कार्याचा बळी

स्वामींचे सत्कार्य बदनाम करून त्यांना त्यांच्या कार्यासह संपविण्याचा प्रयत्न तत्कालीन कर्मठांनी सुरू केला होता. त्यात हेमाद्री हा चतुर्वर्गचिंतामणीकार कट्टर चातुर्वर्ण्य व्यवस्थेचा पुरस्कर्ता प्रमुख होता, तसाच ब्रह्मसानुसारखा कर्मकांडी पुरोहित होता. तत्त्वदर्शनाचे पाठ देणारा राजगुरू महदाश्रमसुद्धा या प्रयत्नात सहभागी

होता.

स्वामींचा लोकमानसावरचा वाढता प्रभाव सहन न होऊन या धर्मवेड्यांनी वेरूळच्या लेण्यात स्वामींना दोनदा विषप्रयोग करून ठार करण्याचा अश्लाघ्य नी निर्लज्ज खुनी प्रयत्न केला होता. तसाच पैठण येथे यंत्रासनावर बसवून ठार करण्याचाही प्रयत्न याच मानसिक विकृतीतून झाला होता. स्वामींना लज्जित करून त्यांचा अवमान करण्याचे कितीतरी प्रयत्न असफल झाले होते.

परंतु राजा रामदेव गादीवर आल्यावर मात्र हेमाद्रीचे हातात निरंकुश सत्ता आली होती. त्यांच्याच कुटिल कारस्थानाने आमणदेवाचे डोळे काढून क्रूर हत्त्या करण्यात आली होती. राजे आमणदेवाच्या गादीवर रामदेवाला बसविण्याचे श्रेय हेमाद्रीच्या पदरी पडले होते. त्या श्रेयाचे बदल्यात रामदेव आता त्याचेच इशाऱ्यावर राज्यशकट हाकीत होता. तो राजा 'परवश' होता. हेमाद्रीचे हातात खेळणारा तो राजा 'निपरवस' आहे असे श्रीचक्रधर स्वामींनी म्हटले होते.

ते खरेच होते. श्रीचक्रधर स्वामींना संपविण्यासाठी हेमाद्रीने राजाज्ञेचे अंतिम शस्त्र वापरण्याचे ठरविले होते. हा कठोर निर्णय घेतला जाणार आहे याची श्रीचक्रधर स्वामी यांना स्पष्ट कल्पना होती. ते आपल्या शिष्यांना सांगत असत, ''आता आमच्यासाठी राजाकडून पालखी येईल. ते देवगिरीस घेऊन जातील आणि खांबी पूजा करतील. हे भाकीत स्वामी बेलापूरला सहा महिने असताना अधूनमधून करीत असत. हे आता उत्तरापंथे निघून जाणार अशी जाणीव झाल्यामुळे एक शिष्य त्यांना म्हणाले होते की आपण राजाची दांडी येण्यापूर्वीच देशांतर करावे. तसे पळून जाण्यासाठी त्यांना कोणताही अडथळा नव्हता. भरपूर वेळ होता. परंतु स्वामी म्हणाले होते, ''तसा जाणार नाही. बोल लावून जाईल.'' स्वामींना कर्मठ धर्मवेड्यांच्या क्रूर कटाची पूर्ण कल्पना होती तरीही तो धैर्यधर पळून जाऊन स्वतःचा जीव वाचविण्याची संधी असूनही देशांतर करून गेला नाही.

बेलापूरच्या शेवटच्या सहा महिन्यात त्यांनी रात्रंदिवस आपले मौलिक आध्यात्मिक पाठ शिकविणे सुरू ठेवले होते. स्वामींच्या ब्रह्मविद्या शिकवण्याचा अखंड ज्ञानयज्ञ बेलापूरास सुरू होता. बेलापूरच्या स्मृती जपणारे तिथले ओटे स्वामींच्या ज्ञानयज्ञाची स्मृती जपतात तशीच त्यांच्या धैर्याची साक्ष देतात.

एके दिवशी सायंकाळी खरेच एक पालखी आली. पालखीसोबत बरेच पाईक राऊत होते. त्यावेळी स्वामींचे सोबत नागदेवाचार्य आणि इतर शिष्यगण

हास्य विनोद करीत बसलेले होते. दांडी आलेली पाहून स्वामी म्हणाले,“ पाहा आमचे साठी राजाची दांडी आली आहे.”

एक मुख्य पाईक राऊत स्वामीसमोर आला आणि प्रणाम करून म्हणाला,“महाराज! आपणांसाठी राजानी ही दांडी पाठविली आहे. आपण विराजित होऊन देवगिरीस चलावेजी!”

स्वामींची तयारी होतीच. मनाने ते केव्हाच या दांडीयात्रेस निघाले होते. ही त्यांची अंतिम यात्रा होती. ती अंतहीन यात्रा राजाच्या दांडीत बसून तयार होणार होती. सोबत स्वामींचे परमभक्त शिष्य श्री नागदेवाचार्यही दांडीचा दांडा धरून चालू लागले होते. रस्त्यात खोकर आणि भोकर नावाच्या गावी दांडी थांबविण्यात आली होती.

रात्रौ भांगसी नावाच्या स्थानी ‘निर्गुडगृहात’ ही दांडी थांबविण्यात आली. पहाटे-पहाटे पुन्हा ही दांडीयात्रा सुरू झाली. दांडीवर झुलीचे कापड टाकलेले होते. आत कोण आहे ते दिसू नये याची काळजी घेण्यात आली होती.

ही दांडी सकाळी देवगिरीच्या विजयस्तंभाजवळ नेण्यात आली. तेथे स्तंभाजवळ राजे रामदेव आणि प्रधान हेमाद्री उभे होते.

राजाला स्वामींचे दिव्य रूप दिसू नये. त्यांचे वेधक व्यक्तिमत्वाचे लोभस दर्शन राजाला होऊ नये म्हणून पालखीवर कापडी झुलीसारखे आच्छादन टाकले होते. त्या आच्छादनातून स्वामींच्या पायाचा आंगठा बाहेर दिसत होता. तो नजरेस आल्याबरोबर राजा रामदेव म्हणाला,“गोसावियांचा आंगठा एवढा बरवा तर गोसावी किती बरवा असेल?’

राजाचा हा उत्स्फूर्त उद्‌गार ऐकून हेमाद्रीच्या पोटात भीतीचा गोळा उठला. राजाने दांडीवरचे आच्छादन काढण्याची आज्ञा दिली तर श्रीचक्रधरांचे दिव्य रूप नजरेस भरेल. त्या वेधक व्यक्तिमत्वाचे दर्शनाने हा नक्कीच प्रभावित होईल. तसे झाले तर मग हा राजा आपले काहीही ऐकणार नाही. या भीतीपायी हेमाद्रीने दांडी वाहकांना आज्ञा दिली,‘न्या ओखटे करा’ या आज्ञेप्रमाणे दांडी घेऊन दांडीवाहक पुढे जाऊ लागले.

तेव्हा शोकाकुत नागदेवाचार्याने स्वामींना अत्यंत काकुळतीने म्हटले,

“प्रवृत्ती भंगावी जी : राजाला सांगावे महाराज! नागदेवाचार्यांचे हे शब्द बाहेर पडत होते तेव्हा एका पाईकाने नागदेवाचार्यांना काठीने हाणून बाजूस सारले.

नागदेवाचार्य दांडीपासून दूर जाऊ लागले. तेव्हा स्वामी त्यांना म्हणाले, "थोडे थांबा हो नागदेवा! नवल एक पाहाल. पुन्हा संबंध देईजैल." स्वामींचे हे शब्द ऐकायला नागदेव तेथे थांबले नाही. थांबू शकले नाहीत. ते म्हणाले, "ना राहावे! न सहावे हो स्वामीराया!" हे स्वामींनी ऐकलेले नागदेवांचे शेवटचे शब्द होते. दोघे एकमेकापासून दुरावले होते. स्वामींची दांडीयात्रा पुढे निघून गेली होती. हीच त्यांच्या अंतिम यात्रेची क्लेशदायी वार्ता घेऊन नागदेवाचार्य दुःखी अंतःकरणाने मिळेल त्या वाटेने निघाले होते. स्वामींचा विरह त्यांना 'न सहावे' असा होता.

दुसरे दिवशी त्यांना पुन्हा स्वामींची वार्ता सांगणारा एक सुहृद भेटला. पाल्हाडांगिया हे त्याचे नाव ! तो राजाचा सेनापती होता. तो नागदेवाचार्यांना सांगू लागला.-

आम्हाला आज सकाळी स्वामींचे दर्शन झाले. मी त्यांना विचारले, "आम्ही ऐकले होते की तुमचे ओखटे केल्या गेले. हे ऐकले ते सत्य की मिथ्य?"

त्यावर स्वामी म्हणाले, "देखिले ते साच की ऐकले ते साच?"

"देखिले ते साच"- पाल्हाडांगिया.

त्यावर स्वामींनी हसत हसत म्हटले,

"देखिले तेही साच अन् ऐकले तेही साच."

येथे 'ऐकले' तो इतिहास होता. देखिले ते वर्तमान होते. इतिहासापेक्षा वर्तमान अधिकच 'साच' असते. पाल्हाडांगियाची ही साक्ष प्रत्यक्षदर्शीची विश्वसनीय साक्ष होती. ती ऐकून नागदेवाचार्यांना स्वामी उत्तरापंथे गेल्याची खात्री पटली. तेवढ्यात पाल्हाडांगियाने त्यांना स्वामी याच रस्त्याने गेल्याचे एक चिन्ह दाखविले. स्वामी तांबूल खात असत. त्या तांबूलाची ताजी पिके या रस्त्यावर पडलेली होती. त्याचा प्रसाद घेऊन नागदेवाचार्य स्वामींचे शोधासाठी पुढे निघाले.

पुढे पुन्हा त्यांना कापडाचे व्यापारी उत्तरेकडून येतांना दिसले. त्यात महदायिसांचे भाचे होते. ते म्हणाले, आम्हांस स्वामींचे घाटावर दर्शन झाले. ते उत्तरेकडे जात होते. ही दुसरी साक्ष ऐकून नागदेवाचार्य त्यांचे शोधासाठी व्याकुळ होऊन रिद्धपूरच्या दिशेने चालू लागले. त्यांची ही विरहावस्था त्यांच्या खाण्यापिण्याचे भान हरवून गेली होती. ते घाट ओलांडून दरे दरकुटे शोधात पुढे पुढेच जात राहिले.

स्वामींचे देहतः येथून जाणे हे नागदेवाचार्यासाठी आत्यंतिक क्लेशदायी

होते. त्या विरहाने नागदेवाचार्य पोळत होते. स्वामींचे देहतः जाणे महाराष्ट्रातून ज्ञानप्रकाशाचे मालवणे होते. त्या करचरणवत ज्ञानसूर्याचा अस्त क्लेशदायी होता. म्हणून आचार्य वेड्यागत त्यांच्या शोधासाठी निघाले होते.

असा ज्ञानसूर्याच्या अस्त कितीही क्लेशदायी असला तरी तो जगाच्या इतिहासाने कितीतरी वेळा पाहिला आहे. रूढ विचारांच्या मूढ मतीने सत्यार्थ प्रकाशाच्या अनंत ज्योती सतत मालविलेल्या आहेत. ज्यांनी सत्यार्थ सूर्याकडे बोट दाखविले त्यांची बोटे करपली, जळाली. सॉक्रेटीसाने सत्यार्थ सूर्याचे दर्शन घडविण्याचा प्रयत्न केला होता. त्याला विषाचे पेल्यात बुडवून संपविण्यात आले. देवाच पुत्र म्हणविणारा जेरूसलेमचा प्रकाशयात्री येशू देवाच्या बागेतील ज्ञानाची फळे लोकांना वाटायला निघाला होता. त्या देवदूतास सुळावर चढविण्यात आले. भारतातही अनेक प्रकाशयात्रिकांना दया न दाखविता मारण्यात आले हा इतिहास आहे.

साडेसातशे वर्षापूर्वी श्रीचक्रधरांनी तर ज्ञानाचा सूर्य हातात घेऊन अज्ञानांधःकार दूर करण्याचा प्रयत्न सुरू केलेला होता. त्यांनी स्वीकारलेले हरपाळदेवाचे पतित शरीर आमच्यातून उत्तरापंथे निघून गेले असले तरी त्यांनी मागे ठेविलेला वचनरूप परतत्त्वाचा प्रकाश आमच्या उद्धारासाठी अक्षय आमच्या जवळ आहे.

कधीही न मावळणारा ज्ञानसूर्याचा हा चिरायु अवतार सदैव आमचे सन्निध राहणार आहे. त्यास विनम्र भावे लक्षलक्ष दंडवत प्रणाम.

लेखक **प्रा. पुरूषोत्तम चं. नागपुरे** गांधी नगर, अमरावती

जन्म : दि. ११ नोव्हेंबर १९३२

जन्मगाव : खडकी, ता. आष्टी, जि. वर्धा

राजपत्रित अधिकारी (वर्ग १) म्हणून महाराष्ट्र शासनाचे शिक्षण खात्यात वेगवेगळ्या पदावर कार्य करून महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन तथा प्रशिक्षण परिषद, सदाशिव पेठ, पूणे येथून प्राध्यापक (राजपत्रित वर्ग १) म्हणून सेवानिवृत्त.

नागपूर विद्यापीठ सिनेटचे सदस्य १९७३ ते १९८३ व विद्यापीठ कार्यकारिणी सदस्य १९७७ ते १९८०

विविध संघटनात्मक, सामाजिक, सांस्कृतिक संस्थांच्या संस्थापनात सहभाग आणि पदाधिकारी म्हणून कार्यरत.

एकुण २१ ग्रंथांचे प्रकाशन, दोन ग्रंथांना भारताच्या मानव संसाधन मंत्रालयाकडून राष्ट्रीय पुरस्कार.

ओज या साप्ताहिकाचे संपादक आणि महानुभाव या मासिकाचे संपादक मंडळात कार्य.

अखिल भारतीय महानुभाव साहित्य महामंडळाचे अध्यक्ष म्हणून कार्यरत.